# बाधा

*[ तीन अंकी स्वतंत्र सामाजिक नाटक ]*

सरिता पदकी



प्रकाशन क्रमांक १४३

ग. पां. परचुरे प्रकाशन मन्दिर, गिरगांव, मुंबअी ४

मूल्य २ रुपये

प्रकाशक :
**ग. पां. परचुरे**
ग. पां. परचुरे
प्रकाशन मन्दिर
गोरेगांवकर चाळ क्र. २
गिरगांव, मुंबअी ४

मुखपृष्ठ :
**गोपालकृष्ण भोबे**

आवृत्ति पहिली
डिसेंबर १९५६



मुद्रक :
**वि. पु. भागवत**
मौज प्रिंटिंग ब्यूरो,
खटाववाडी, मुंबई ४

माझं हें पहिलंच नाटक. पहिलेपणाच्या पांघरुणाखालीं नाटकांतल्या ज्ञाताज्ञात दोषांना संरक्षण देण्यासाठीं हें सांगत नाहीं, तर ज्या उत्साहानं त्याचं कौतुक करीत आहें त्यांतलं साहस आणि उत्तेजन नीट लक्ष्यांत यावं म्हणून हा उल्लेख.

या नाटकांतली 'तारा' सर्वांच्या पाहण्यांतली, परिचयांतली, नात्यांतली-देखील. तिच्या थिल्लर रंगेलपणाखालीं दडपलेली थोर व्यथा जाणून घेण्याचा हा प्रयत्न.

आज हा जो 'भारतीय विद्या-भवन कलाकेंद्रा' तर्फे 'बाधा'चा प्रयोग होतो आहे त्याचे निर्मिति-प्रमुख श्री. आनंद पै, दिग्दर्शक श्री. नंदकुमार रावते. आणि भूमिका अनुक्रमें सुनंदा रावते, वीणा देळगी, कविता नवलकर, रमेश होनावर, शशी भागवत, कमलाकर सारंग, श्रीधर घैसास, परमानंद सबनीस आणि नंदकुमार रावते यांनीं केलेल्या. या सर्वच कलावंतांनीं घेतलेल्या कष्टांबद्दल मी त्यांची अतिशय आभारी आहें.

आज, इतक्या अल्पावधींत, आणि इतक्या सुबकपणानें हें नाटक प्रकाशित व्हावं म्हणून घेतलेल्या श्रमांबद्दल श्री. ग. पां. परचुरे यांचीही मी फार ऋणी आहें.

आणि ज्यांच्याशीं वेळोवेळीं चर्चा करून हें नाटक लिहिलं त्या अकृत्रिम स्नेह्यांचं ऋण! तें अनुक्त ठेवणंच अधिक सोपं!

२०-१२-५६

—सरिता पदकी

## पात्रांचा अल्प परिचय

*तारा* : वडिलांच्या माघारी नोकरी करून घर सांवरून धरलेली मुलगी. वय वर्षे २८

*आई* : ताराची पन्नाशीची आई.

*नलू* : ताराची धाकटी बहीण. वय १७–१८.

*बाळ* : ताराचा धाकटा बेकार पण हुशार भाऊ. लहानपणापासून टक्केटोणपे खाल्ल्यामुळें याला जगाचें विलक्षण ज्ञान आलेलें आहे. वय २५–२६

*विश्वनाथ* : एक श्रीमंत, 'रसिक' तरुण.

*माधव* : नलूचा नेमस्त, सालस वर.

*चंद्रशेखर* : विश्वनाथप्रमाणेंच. कदाचित् थोडा कमी 'रसिक'.

*कुमार* : एक कोंवळा भाबडा गरीब तरुण.

*एक शेजारी* : नेहमींच्या शेजाऱ्यांसारखाच.

# अंक पहिला

*स्थळ : गरीब मध्यमवर्गाच्या बिऱ्हाडांतील 'बसायची खोली'. प्रेक्षकांच्या समोर मध्यावर असलेलें दार बाहेरून या खोलींत येण्याकरतां आणि डाव्या बाजूचें घरांत नेणारें. खोलींत सर्व प्रकारचें सामान आहे. दोनतीन मोडक्या खुर्च्या, भिंतीला टांगलेला आरसा, एखादें कलडर आणि घरांतल्या कर्त्या दिवंगत पुरुषाचा जुना फोटो. त्यावर एखादा (सुकलेला) हार.*

*सुरुवातीस, पडदा वर गेल्यावर, आपल्याला नलू दिसते. ती कसल्या तरी गडबडींत आहे. टेबलक्लॉथवर नसलेल्या सुरकुत्या नीट कर, खुर्चीची जागा उगीचच बदल, सामानावरची पुन्हांपुन्हां झटकलेली धूळ झाड आणि हें करतांना घाईघाईनें आरशांत डोकावून स्वत:च्या कपाळावरची बट नीट कर—असे तिचे धांदलीचे उद्योग चाललेले आहेत. ती मोठ्या आनंदांत दिसते आहे—कांहीं गुणगुणते-देखील. खोली आणि आपण स्वत: आज विशेष आकर्षक दिसावें यासाठीं तिची धडपड चालू आहे.*

*इतक्यांत बाहेरून बाळ येतो. अतिशय थकलेला. अंगावर मळके कपडे. चेहऱ्यावर वैताग. हातांत सिगरेट. तो येतो आणि एका खुर्चीवर बसतो. त्याची नेहमीची संवयीची बैठक घेऊन. बाहेरून येतांनाच त्यानें एक इंग्रजी डिटेक्टिव्ह कादंबरी आणली आहे. तिच्या अर्धवट वाचलेल्या भागांत बोट ठेवूनच तो आलेला आहे. बसल्या-बरोबर दुसरीकडे कुठेंही लक्ष न देतां वाचायला सुरुवात करतो. घरांतल्या आणि मनांतल्या अप्रिय गोष्टींना विसरण्याचा त्याचा हा ठराविक उपाय आहे.*

**नलू :** *(आनंदांत)* बाळ, अगदीं वेळेवर आलास रे !

*(बाळचें लक्ष नाहीं. नलू थोडीशी खट्टू होते तरी परत उत्साहानें बोलायचा प्रयत्न करते.)*

**नलू :** आज बरं आयतंच तुला लौकर यायचं सुचलं. मी सांगायची विसरूनच गेलें होतें तुला !

*(तरीही बाळ ऐकत नाहींसें पाहून आवाज चढवून)*

**नलू :** बाळ, तुझ्याशीं बोलतेंय् मी !

*(त्याच्याजवळ जाते व त्याच्या हातांतून पुस्तक बाजूला करते. आतां बाळला लक्ष देणें प्राप्त आहे.)*

**बाळ :** काय ?

**नलू :** *(रागानें)* क्यॅय काय ? केव्हांची ओरडतेंय् मी ! कपडे बदला—अवतार आवरा आपला जरा—

**बाळ :** कां ?

**नलू :** आज बाहेरचीं माणसं यायचीं आहेत तुमच्याकडे. भीति वाटायची त्यांना तुमच्याकडे पाहून !

**बाळ :** कोण येणाराय् ?

**नलू :** "हे" यायचेत, माहीत नाहीं तुला ?

**बाळ :** "हे" कोण ?

**नलू :** माधवराव यायचेत आज आपल्याकडे—लग्न ठरल्यापासनं पहिल्यांदाच !

**बाळ :** मग येऊं देत कीं !

**नलू :** तूं असा पिंपळावरच्या मुंजासारखा समोर दिसल्यावर.........

*(बाळ पुस्तकांत गढलेला पाहून फणकाऱ्यानें निघून जाते.)*

*(स्वैपाकघरांतून आई येते. सिगरेट फुंकीत, स्वस्थपणें पुस्तक वाचत बसलेल्या, विसकटल्यासारख्या दिसणाऱ्या आपल्या चिरंजीवांना दोन क्षण न्याहाळते. बाळचें पुस्तक वाचणें चालूंच. अखेर आईच बोलायला सुरुवात करते.)*

**आई :** कधीं आलास रे ?

**बाळ :** *(पुस्तकावरचें लक्ष न काढतां. फक्त सिगरेट बोटांत लपवून)* दोन मिनिटं झालीं.

**आई :** गेला होतास का मग?

**बाळ :** *(पुस्तक वाचणं चालूच)* कुठं? *(सिगरेट हळूंच विझवून टेबलाच्या खणांत टाकतो.)*

**आई :** *( या* indifference *नं चिडन)* कुटं काय?

**बाळ :** मी बऱ्याच ठिकाणीं गेलों होतों आज. सकाळीं मंडईत—तिथून दुकानांत—नंतर सिनेमाला—*(आईची. हरकत दिसतांच)* पांच आण्यांत बसलों होतों—नंतर कॉलेजचं ग्राउंड आणि तिथून...

**आई :** मसणांत.

**बाळ :** *(शांतपण)* नाहीं, तिथं नव्हतों गेलों.

**आई :** जाल लौकरच, आईला पोंचवायला !

*(यावर बाळही चिडतो. पण कांहीं न बोलतां पुस्तकांत लक्ष घालायचा प्रयत्न करतो.)*

**आई :** *(स्वत:शींच, पण बाळला ऐकूं जाईल, अशा बेतानें)* मुलगा व्हावा म्हणून नवस करायचे ते मुलगा कष्ट करील, पैसा मिळवील अन् घर चालवील, म्हणून. पण आमच्याकडे सगळंच उलटं आहे. मुलीनं कष्ट करायचे, रक्त आटवायचं अन् मुलानं बसून खायचं, मन मानेल तसं भटकायचं, धूर सोडीत उडायचं...हॉटेलं, सिनेमे! त्याच्यापेक्षां मुलगा झालाच नसता किंवा झाल्याबरोबर...

**बाळ :** *(चिडन)* झाल्याबरोबर नख लावलं नाहींस याबद्दल तुझे आभार मानूं का?

**आई :** बोलायला तेवढा शिकलाय्.

**बाळ :** मग काय फांस लावून घेऊं?

**आई :** तेवढंच व्हायचं तुमच्या हातून.

**बाळ :** *(खिन्नपणें)* तेंही होत नाहीं...कांहींच जमत नाहीं...कांहींच !

**आई :** माजोरीपणा आहे ना अंगांत! चांगली चिठ्ठी लिहून दिली होती बहिणीनं...

**बाळ :** तिच्या चिठ्ठीवर मला नोकरी मिळणार!

**आई :** पण तुला सहज जायला काय झालं होतं?

**बाळ :** बहीण 'प्राइम मिनिस्टर' नाहीं माझी!

*(नलू येते. दोघांनाही तशींच बसलेलीं पाहून तणतणते)*

**नलू :** कांहीं नाहीं, मी सरळ जाऊन सांगून येतें कीं आमच्या घरांत माणसं रहात नाहीत...भुतं रहातात. कांहीं कुणी आमच्याकडे येऊं नका. आल्यावर असलींच माणसं दिसायचीं ना...मळलेलीं, कावलेलीं...

*(जायला निघते.)*

**आई :** *(संतापून)* नले! काय बडबडलीस?

*(नलू थबकते.)*

**नलू :** *(रडकुंडीला येऊन)* मग काय करूं? आज ते यायचेत; आत्तां येतील... तुला जसं कांहीं माहीतच नाहीं!

**आई :** माहीत आहे म्हणून तर इतका वेळ फराळाचं करीत बसलें होतें ना!

**नलू :** पण एकदां स्वतःकडे बघ! केस बघ, लुगडं बघ...जांवयाचं स्वागत असंच करणार ना?

**आई :** तूं बसली आहेस ना नटून केव्हांची?

**नलू :** आणि तुम्ही बसा भांडत. ती ताई तर कांहीं आज रात्रीपर्यंत परत यायची नाहीं ऑफिसांतनं. हव्वं तें करा—मला काय करायचंय्?

*(निघून जाते. फणकाऱ्यानें.)*

**आई :** आत्तांपासनंच ही असं वागायला लागली!—परक्यासारखं!... *(बाळशीं संभाषण सुरू करीत)* अरे, तुझी बहीण दुसरीतिसरी कुणी नसली तरी त्यांच्या हाताखालीं काम केलंय् तिनं—इमानानं, झटून. ते तिला चांगली ओळखतात!

**बाळ :** आपल्याला भीक मिळाली या ओळखीवर दुसऱ्या एखाद्याला त्या भीक देणाऱ्याकडे घेऊन जाण्यांत काय अर्थ आहे?

**आई :** मग कशांत अर्थ आहे? या तुझ्या ऐदीपणांत? ऐतखाऊपणांत! बहिणीच्या कमाईवर जगण्यांत? शरम वाटली पाहिजे तुला!

**बाळ :** माझ्या पंधराव्या वर्षी चार मुली, बायको नि भरपूर दारिद्र्य मागं ठेवून माझे वडील वारले याची? कीं मॅट्रिकपर्यंतचं शिक्षणसुद्धां उदबत्त्यांचे पुडे न् वर्तमानपत्रं विकून करावं लागलं याची?

**आई :** लग्न न करतां बहीण तुझ्यासाठीं न् तुझ्या आईबहिणींसाठीं हाडं झिजवते आहे—स्वतःला खड्ड्यांत चिणून घेऊन तुम्हांला वर चढवते आहे याची!

**बाळ :** कांहीं उपकार नाहीं केले कुणी कुणावर. तिच्या जागीं दुसरं कुणी असतं तरी त्यानं तेंच केलं असतं.

**आई :** तुम्ही काय केलं न् काय करतां अहां तें दिसतंच आहे!

**बाळ :** कां, काय करायचं बाकी ठेवलं आहे मी?

**आई :** बहिणीच्या जिवावर जगायचं, एवढंच करतो आहेस ना?

**बाळ :** ज्याला मरतां येत नसेल त्याला दोन घास खाल्ल्याखेरीज अन् चिंध्या कां होईना अंगावर घातल्याखेरीज जगतां येत नाहीं, म्हणून हें तुझं बोलणं ऐकून घ्यायला लागतंय्. तुला फक्त तुझ्या मुलीचे कष्ट दिसतात, अन् मी डोळ्यांत खुपतों.

**आई :** डोळ्यांत खुपण्यासारखं कांहीं करूं नये माणसानं!

**बाळ :** स्टेशनवर किंवा मंडईत जाऊन बोजे उचलायचेंच बाकी राह्यलंत आतां

**आई :** कां? शिकवलाय् न मॅट्रिकपर्यंत बहिणीनं?

**बाळ :** मॅट्रिकचा शेवटचा पेपर दिल्यापासनं वणवण हिंडलों, अनोळखी माणसांचे पाय धरले, लाथा खाल्ल्या, तरी नोकरी मिळाली नाहीं. हें मिंधं अन्न खायला लागलं. आळशीपणाचे पोवाडे ऐकून घ्यायला लागले—कान उघडे ठेवून नि तोंड मिटून. घरीं रिकामं बसवत नाहीं म्हणून रस्त्यावर भटकायचं, ओसाड मन भरून जावं म्हणून त्यांत धूर कोंबायचा न् ओसाडी वाढवून मात्र घ्यायची... मरण्यापेक्षां जगणं शतपटीनं कठीण झालंय् मला.

*(नलू पुन्हां येते. बाळचीं शेवटचीं कांहीं वाक्यें ऐकते.)*

**नलू :** अजून नाहीं बोलणं संपलं तुमचं?......आत्तां ते आले न् त्यांनीं ऐकलं तर?

**आई :** ऐकूं देत. केव्हां तरी कळायच्याच आहेत त्यांना साऱ्या गोष्टी!

**नलू :** म्हणून अगदीं पहिल्याच भेटींत नको सारं व्हायला!—चल रे, घरांत जा न् अवतार आवर जरा! काय तें तोंड झालंय् उन्हांत भटकून! अन् केसांना किती दिवसांत तेल लावलं नाहींस रे? जा...आणि आई तूं तरी काय ग? तुझ्या बोलण्यानं का नोकरी मिळायचीय् त्याला?

**बाळ :** *(उपरोधानें)* आतां तिची चिठ्ठी घेऊन जातों!

**नलू :** ताराताई अजून आली नाहीं. तरी तिला लौकर यायला बजावलं होतं मीं तीनतीनदां! पण यांना मुळीं कशाचंच कांहीं नाहीं ना......

**आई :** *(नलूला)* अशी आपल्या मनाला येईल तसं ती वागली असती तर एक दिवस तरी नोकरी टिकली असती का तिची? तुम्हांला हे दिवस दिसले असते का—स्वप्नांत तरी? अन् या फटिंगाला बेछूट वागायला मिळालं असतं का?......नोकरी नाहीं धंदा नाहीं!

**नलू :** पुन्हां तेंच!

**आई :** मग, खोटं आहे कां कांहीं?

**नलू :** ........पण म्हणून.........

*(काय बोलावं तें न सुचून आंत निघून जाते.)*

**आई :** त्या पोरीसाठीं जीव तिळतिळ तुटतो माझा. आतां तिची धाकटी बहीण ही......हिचं लग्न व्हायचं! न् तिनं कधीं स्वतःचा विचारच करायचा नाहीं? सतराव्या वर्षापासनं पोरगी खपतेय्. तुमचे वडील गेले न् हिनं त्यांची जागा घेतली. इतक्या लहान वयांत—हौसमौज करावी, स्वच्छंदपणानं वागावं असं वाटण्याच्या वयांत!...किती कष्ट ते! शाळेला न जातां नोकरी करायची, रात्रीं मान मोडून अभ्यास करायचा न् नादारी राखायची! कॉलेजांत गेल्यावर सकाळीं कॉलेज अन् न जेवतांच ऑफिस...केव्हां तरी रात्रीं अन्न भेटायचं! इतकं करून कधीं दोनाच्यावर तिसरं पातळ कांहीं घेऊं शकली नाहीं. त्या दोघींचीं लग्नं, बाळंतपणं...भावाचं शिक्षण अन् आतां बहिणीचं लग्न...अन् साऱ्यांचं झालं तरी मी आहेंच उभी पिशाच्चासारखी हात पुढें करून! या आपल्या माणसांच्या जंजाळांतनं ती कधीं सुटायची रे? कधीं मोकळी व्हायची तूं असं केलंस तर?

*(गळा भरून येतो.)*

**बाळ :** *(गलबलून)* रडूं नकोस तूं आई...मला का कांहीं दिसत नाहीं ?

**आई :** *(पुन्हां चिडून)* तुझे डोळे जरी थोडेसे उघडे असते तरी असा लहरी-पणानं वागला नसतास !

**बाळ :** *(खवळून)* काय लहरीपणानं वागलों ग मी ? काय जुगार खेळलों कीं घोडे उडवले ?

**आई :** तेंच करायला लागतं असं थोडंच आहे ? आज तिनं चिठ्ठी दिली होती तरी...

**बाळ :** सांगितलं ना तुला कीं ताईची चिठ्ठी म्हणजे गव्हर्नराच्या हुकमाचा कागद नव्हे म्हणून ? तुझी तारा तुला फार महान् व्यक्ति वाटत असली तरी ऑफिसरच्या लेखीं ती एक कारकून आहे, हाताखालची एक नोकर आहे— विश्वासू, आज्ञाधारक नोकर आहे एवढंच.

**आई :** एवढंच कसं असेल ?

**बाळ :** आणि आतां तेवढंही नाहीं !

**आई :** कां ?

**बाळ :** कां तें तुला माहीत नाहीं ? तुझ्या चतुर्मुख शेजारणींपैकीं एकीचीही नजर तिच्यावर पडली नाहीं ?

**आई :** कशावर ?

**बाळ :** अशा गोष्टी तर बायकांना फार लौकर उमगतात म्हणे !

**आई :** काय म्हणायचं आहे तुला ?

**बाळ :** कळलंय् तुला तें !

**आई :** बाळ, भलतंसलतं बोललास तर तोंड फोडीन.

**बाळ :** मर्जी तुझी !

**आई :** त्या पोरीबद्दल मी चांगलं बोललें म्हणून दुस्वास वाटला होय रे तुला ! इतकीं वर्षं पहातेंय् मी तिला. आईच आहें तिची मी. आंखल्यासारखं सरळ जगत आलीय ती. मान मोडून काम करावं, पडेल तें खावं, मिळेल तें ल्यावं, वर डोळा करून कुणाकडे पाहूंसुद्धां नये—

**बाळ :** फक्त नात्यांतला म्हणून सांगून कुणाही पुरुषाबरोबर वेळींअवेळीं हिंडावं, हॉटेलांत जावं...

**आई :** कुणाबद्दल बोलतोयस तूं?

**बाळ :** ताराबद्दल—तारा न् विश्वनाथबद्दल!

**आई :** कुठला विश्वनाथ?

**बाळ :** आमचा चुलतमावस आतेभाऊ! तारानं हीं नातेंवाचक विशेषणं गाळलीं आहेत म्हणा लोकांसाठीं!

**आई :** बनूवन्संचा विसू ना?

**बाळ :** तोच...

**आई :** *(अजून विश्वास बसलेला नाहीं)* बंगलोरला असतो तो...

**बाळ :** आलाय् सहा महिन्यांपूर्वीच इथं...

**आई :** एव्हांना लग्नही झालं असेल त्याचं!

**बाळ :** म्हणून आपल्यासाठीं जीव टाकणाऱ्या पोरीबरोबर त्यानं हिंडूं नये असं थोडंच आहे? मिळवत्या मुलीबरोबर चैन करणं तर फारच फायद्याचं!

**आई :** *(त्यालाच अडवीत)* काय रे, सहा महिने तुला हें सगळं दिसत असतांना तूं कां झाडला नाहींस त्याला? घरीं तर जिभेचे पट्टे फिरवीत असतोस!

**बाळ :** तें योग्य माणसावर!

**आई :** मग...

**बाळ :** हॉटेलांत, पार्कांत, ग्राउंडवर, कुठल्याही ठिकाणीं अन् कुठल्याही वेळीं हीच वाट पहातांना दिसते मला. टक लावून, अगदीं डोळ्यांत प्राण आणून! तिला बोलायला हवं खरं म्हणजे. पण तिच्याच घरांत तिला खडसवायची माझीच काय माझ्या बापाचीसुद्धां—

**आई :** बाळ्या!

**बाळ :** पाह्यलंस ना कसा राग येतो तुला तें?

**आई :** मग काय आरती ओवाळूं?

**बाळ :** आत्तांसुद्धां...विद्या कॉलेजच्या आवारांत बुचाच्या झाडाखालीं उभं राहून मार्गप्रतीक्षा चालू असेल तिची!

**आई :** तूं गेला होतास पहायला?

**बाळ :** आज नव्हतों गेलों!

**आई :** मग जीभ फार सैल सोडूं नकोस! मोठी बहीण आहे तुझी ती.

**बाळ :** शिवाय अन्नदात्री!

*(नलू येते.)*

**नलू :** अजून ताई आली नाहीं. एवढं कसलं काम असतं कोण जाणे!

**बाळ :** तें तुला नाहीं कळायचं।

**आई :** बाळ्या...

**नलू :** अन् काय रे आळसोब्या, मघांशीं मी एवढी बजावून गेलें तरी...जा, लोकांसमोर अब्रू नका घालवूं आमची.

*(त्याला आंत ढकलतेच. तो जातो. आतां जें ऐकलं आहे त्यानं आई चिन्ताक्रान्त. नलू आतुर. दाराशीं पाय वाजतात.)*

**आई :** *(सुटकेचा निःश्वास)* आली वाटतं ..

**नलू :** *(धांदलींत माधव आल्यासारखं वाटून)* आई...अग...

*(तारा प्रवेश करते. ऐन सतराव्या वर्षापासून दहाबारा वर्षं नोकरी केल्यामुळें खुरटलेली, करपलेली दिसणारी ही मुलगी. रुक्ष चेहरा, बारीक अंगकाठी, ऑफिसमध्यें जातांना केलेला साधा, चुरगळलेला वेष. हातांत पर्स आहे. ती येते तेव्हां चेहरा ओढल्यासारखा दिसतो. आल्याबरोबर चपला, पर्स रोजच्या ठिकाणीं ठेवते.)*

**आई :** किती उशीर केलास ग! केव्हांची वाट पहातोंय् आम्ही तुझी!

**तारा :** *(उगीचच संतापून)* वाट कशाला पाहिलीत? कुणी पळवून नेणार होतं कीं काय मला?

**आई :** *(समजुतीच्या सुरांत)* तसं नाहीं ग. नलूचे यजमान यायचेत ना आज? त्यांच्याशीं बोलत बसायला तुझ्याखेरीज कोण आहे आपल्याकडे?

**तारा :** *(उगीचच संतापल्याचं लक्षांत येऊन)* खरंच अग, लक्षांतच राहिलं नाहीं माझ्या. *(नलूकडे पाहून उसन्या उत्साहानं थट्टा करीत)* मग काय एक माणूस आज अगदीं खूष असेल ना? 'तिकडून' येणं व्हायचंय् ना?

**नलू :** *(रुष्टपणें)* हो, पण तुम्हांला काय त्याचं?

**तारा :** वा वा, असं कसं होईल? आमचेही कुणी लागतात म्हटलं तुमचे 'तिकडून'!

**नलू :** मग लवकर कां नाहीं आलीस घरीं?

**तारा :** अग, लवकर यायचं म्हणून केव्हांच निघालें होतें मी ऑफिसांतनं... *( चुकून बोलूं नये तें बोललयाचें लक्ष्यांत येऊन चाचरते ).*

**आई :** *( संशयानें )* मग?

**तारा :** *( सांवरून घेत )* मग काय, अग? ऑफिसच्या फाटकांत पाऊल टाकतेंय् न टाकतेंय् तितक्यांत बोलावणं आलं साहेबांचं 'अर्जंट काम आहे, तेवढं करून जा' म्हणून.

**नलू :** एक दिवस तुझं काम कुणी दुसऱ्यानं केलं नसतं वाटतं?

**तारा :** छे. अग, सतराशेंसाठ फायली अन् लक्षावधि एंट्रीज. बेरजा, वजाबाक्या...चुका न् दुरुस्त्या. ज्याचं त्यालाच कळायचं तें सारं. शिवाय सीनिअर क्लार्क झालेंय् ना मी आतां? ऑफिसांतलं पान हलत नाहीं माझ्यावांचून! दहाला पोचलें कीं जें काम सुरू ते सहाला गड्यानं येऊन ऑफिस सुटल्याचं सांगेपर्यंत. फार थकल्यासारखं होतं ग त्यामुळं. *( खुर्चीवर अंग टाकते. )*

**आई :** *(काळजीनें )* तरीच अशी वाळल्यासारखी दिसतेस. आधींच कुठं लठ्ठ होतीस म्हणा? पण आतांशा आणखीनच ओढल्यासारखी, वाळल्यासारखी दिसायला लागलीयस.

**तारा :** *( उसन्या आनंदानं )* छे ग, वाळतेंय् कुठली? सुटत चाललेंय् चांगली! ...आतांशा काम कमीच असतं ऑफिसांत! सीनिअर क्लार्क झालेंय् ना?

**नलू :** मग काम कमी कां जास्त?

**तारा :** *( सुधारून घेत )* म्हणजे जबाबदारी वाढल्येय्...पण काम कमी झालंय्.

**आई :** तं तुझं तुला माहिती बघ! आम्हांला काय कळणार त्यांतलं? पण आज जरा जास्तच थकल्यासारखी दिसलीस म्हणून...

**तारा :** *( पुन्हां उसन्या उत्साहानं )* छे अग, आज तर मी फार खुषींत आहें.

आज आमचे धाकटे मेहुणे यायचेत! मला ऑफिसांतच दिसत होतं आज नलूताई कशा नटत मुरडत असतील तें! *(नलूला)* काय पण थाट! अन् नले, ही साडी माधवरावांनीं दिलेली ना?...चैन आहे न् काय!...लग्नाआधींच करतोय् नवरा आपले लाड!

**नलू :** आतां तुला चिडवायचं सुचायला लागलं का?

**तारा :** मग, हक्कच आहे तो माझा! तुझं कौतुक करायचं, लाड करायचे, तुला चिडवायचं, मीं नाहीं तर कुणीं?...फक्त माधवरावांनीं?

**नलू :** *(लाजून)* चल्...!

**तारा :** हीच साडी नेस असं तुला सांगायला म्हणून खूप लौकर निघालें होतें मी आज...*(पुन्हां नको तें बोलून गेली आहे. पुन्हां आईचा संशय जागा झाला आहे. पण तारा स्वत:ला सांवरून घेत आहे––)*...पण विश्वनाथ भेटला वाटेंत! अशी भरभर येत होतें तर वाटेंत दत्त म्हणून उभा! सायकल अगदीं पुढंच थांबली माझ्या म्हणून दिसला तरी मला.

**आई :** *(संशय कायमच)* काय म्हणत होता?

**तारा :** *(मोठा कठीण प्रश्न आहे!)* विशेष काय म्हणणार? अशाच आपल्या इकडच्या तिकडच्या गप्पा!

**आई :** तरी पण?

**तारा :** *(बनवून सांगते सारें)* असंच आपलं...तो इथं असतांनाच्या आठवणी!...म्हणजे एकदां काय झालं, मी अशी अगदीं लहान होतें... सातआठ वर्षांची...

**आई :** तूं चार वर्षांची होतीस ती मंडळी इथनं गेली तेव्हां!

**तारा :** *(तशीच पुढें बोलते)* हो, मग तेवढीच असेन! तेव्हां त्यांच्याकडें एकदां संध्याकाळीं खेळायला गेलें तर आपला त्यांचा कुत्रा––प्रिन्स होतं त्याचं नांव...

**आई :** वन्संना तर कुत्र्याची फार भीति वाटायची!

**तारा :** तरी बाळगला होता म्हणे त्यांनीं...तुला आठवत नसेल! भला जंगी न केसाळ कुत्रा होता तो! तर सांगायचं काय, कीं मीं फाटकाच्या आंत पाऊल

टाकलं मात्र, त्यानं एकदम अशी भुंकायला सुरुवात केली कीं मी जोरांत किंचाळ-लेंच! सगळीं माणसं घाबरून गेलीं...पण अग, त्या कुत्र्याला तर सांखळीनं बांधलं होतं! *(फार मोठी विनोदी हकीगत सांगितल्यासारखी स्वत:च खूप मोठ्यानें हंसते. नलू थोडीशी हंसते. आई मख्ख.)* अशा एक ना दोन, खूप आठवणी! खूप बोलका, मनमोकळा झालाय् तो.

**आई :** त्याची न् तुझी ओळख कुठें झाली ग?

**तारा :** हें काय विचारणं आई? आपल्या नात्यांतलाच ना तो?

**आई :** पण तुला कळायला लागायच्या आधींपासनंच बंगलोरला गेलेत ते लोक!

**तारा :** म्हणून पुन्हां ओळखी होऊं नयेत कीं काय? आमचे बॉस न् त्याचे वडील फार जुने दोस्त म्हणे. त्यांना भेटायला आला होता तो...मी ओळखलंच नाहीं त्याला. पण त्यानं मात्र मला झटकन् ओळखलं हं!

**आई :** किती दिवस झाले त्याला इथं येऊन?

**तारा :** झाले सात आठ महिने.

**नलू :** मग कधीं घरीं आला नाहीं तो?

**तारा :** अग माझ्याकडून कळतच होती ना तुमची खुशाली? *(घाईघाईनें)* म्हणजे अशीच कधीं रस्त्यांत गांठ पडली म्हणजे...घाईघाईत दोन शब्द बोला-यला मिळायचे...

**आई :** तरी घरीं यायला हवं होतं त्यानं...लग्न झालंय् का त्याचं?

**तारा :** नाहीं म्हणे!...

**आई :** तूं बोलावलं होतंस का त्याला घरीं?

**तारा :** *(चिडून)* मी कशाला बोलवायला पाहिजे? येईल त्याचा तो.... त्याला वाटलं तर...वाटेल तेव्हां! आजमुद्धां त्याला यायला कुणी नको का म्हटलं होतं?... पण कुठं आला तो?...आला का?

**आई :** न कां येईना—आपल्याला काय त्याचं?

**नलू :** ताई, आतां अशीच किती वेळ रहाणार आहेस तूं?

**तारा :** *(दचकून)* 'अशीच' म्हणजे?

**नलू :** अशी ऑफिसच्या कपड्यांत?...साडी वगैरे बदल ना जरा ऑ तोंड धुवून fresh हो...खायची बशी भरून ठेवलीय् मी...साडीसुद्धां काढून ठेवलीय्...

**तारा :** *(सगळी बनवाबनवी संपवायला मिळाल्यामुळें relieved.)* अच्छा, म्हणजे तुझ्याबरोबर आम्ही पण नटायला पाहिजे आज?

**नलू :** अर्थात्! तें काय सांगायला पाहिजे? आई चल, तूं पण लुगडं बदल. चलो भागो...

*(आई आणि तारा आंत जातात. नलू एकटीच स्टेजवर रहाते. सामानाची थोडी चाळवाचाळव करते. माधव येतो. टाकठीक वेष केलेला. आनंदी.)*

**नलू :** अय्या! तुम्ही? (आंत वळत) आईऽ...

**माधव :** थांब. आईला कशाला हांक मारतेस?

**नलू :** तुम्ही आलां अहांत ना?

**माधव :** मग? मला काय दाखवण्यासाठीं आणलाय् आल्याबरोबर सगळ्यांनीं जमा व्हायला?

**नलू :** तसं नव्हे, पण...

**माधव :** पण काय? तूं एकटी सांपडलीस म्हणून खाईनबिईन कीं काय मी तुला?

**नलू :** इश्श! कांहींतरीच्च...

**माधव :** मग बैस अशी तिथं...

*(नलू एका खुर्चीवर अवघडून बसते. भयंकर गोंधळलेली...बोलत नाहीं कांहींच.)*

**माधव :** बस्? असंच का आमचं स्वागत? बोलणारसुद्धां नाहीं एखादा शब्द!

*(तरीही नलू गप्पच. मग माधवच विषय काढतो.)*

**माधव :** छान दिसतेय् साडी. तुला कशी काय आवडली?

**नलू :** *(आनंदानें)* छान आहे.

**माधव :** *(साभिप्राय)* छान दिसतेय्.

**नलू :** कुणाची पसंती?

**माधव :** *(उत्साहानं)* त्या साड्यांतलं आपल्याला कांहीं कळत नाहीं बुवा... पहिलीच बायको करायची आहे ना मला अजून? साडी घ्यायचं मनांत आल्याबरोबर दुकानांत गेलों अन् दुकानदाराला सांगितलं कीं "हें बघ, एक फार गोड मुलगी गांठलीय् मी!"

**नलू :** *(लाजून)* चला, कांहींतरीच...

**माधव :** तुला नाहीं कळायचं तें! हं, तर त्या दुकानदाराला मी सांगितलं कीं अशा मुलीला आवडेलशी साडी दे एखादी. त्यानं जी दिली ती सरळ घेऊन निघून आलों. *(साभिप्राय)* दुकानदारही रसिक भेटला मला!

**नलू :** खरंच वाटेल एखाद्याला सारं!

**माधव :** पण साडीच्या मालकिणीची पसंती मात्र माझी हं!

**नलू :** आतां हांक मारतें आईला नि ताईला.

**माधव :** पुन्हां तेंच! दुसरं कुणी यायच्या आंत तुला फार महत्त्वाचं कांहीं सांगायचंय् मला...

**नलू :** मला?

**माधव :** हो—तुला...एकटीला!

**नलू :** काय सांगायचंय् एवढं?

**माधव :** इकडे ये अशी, जवळ!

*(नलू किंचित् पुढें सरकते.)*

**नलू :** हं, काय?

**माधव :** पहिली गोष्ट,...ऐकतेयस ना नीट?...तूं फार सुंदर आहेस...

**नलू :** *(लाजून)* इश्श्!

**माधव :** दुसरी गोष्ट...मला तूं फार फार आवडलीस. माझी प्रेयसी जशी असावी असं मला वाटत होतं ना, अगदीं तश्शीच तूं आहेस. सुंदर, गोड, लाजरीबुजरी...*(नलू लाजून चूर, गोंधळलेली)*...अं? पटतंय् का?...आणि तिसरी गोष्ट, आत्तां मी तुला आमच्या घरीं न्यायला म्हणून आलोंय खरा, पण तसं फक्त तुझ्या घरच्या मंडळींना सांगायचं.

**नलू :** *(आश्चर्यानं)* म्हणजे?

**माधव :** याचा अर्थ अगदीं उघड आहे. तुला मी आत्तां आमच्याकडे नेणार नाहीं आहें.

**नलू :** पण मी तर अगदीं तयार होऊन बसलेंय्!

**माधव :** म्हणून तर आपण दोघं आत्तां फिरायला जाणार आहोंत. तुला तयार व्हायला जो अर्धापाऊण तास लागला असता तो तर वाचला आपला!...आत्तां इथनं भर्रदिशीं सटकायचं आणि दोघांनींच फिरायला जायचं. खूप लांब...आणि फक्त दोघांनींच. कळलं?

*(नलू मानेनंच 'हो' म्हणते, बावरलेलीच.)*

**माधव :** अरे खरंच, विसरलोंच. हें बघ काय आणलंय् तुझ्यासाठीं मीं तें!

*(एक सुंदर घड्याळाची पेटी उघडून तिच्यापुढें धरतो. नलू थक्क होते.)*

**माधव :** मुद्दाम नाजूक निवडून आणलंय मीं. तुझ्या मनगटावर शोभून दिसेलसं, आवडलं?

**नलू :** *(पोरवयांतल्या आनंदानें)* खूप!

**माधव :** बांध ना, पाहूं दे तरी कसं दिसतंय् तें!

*(नलू हातावर घड्याळ बांधायला जाते. संवय नसल्यानं आणि गोंधळलेली असल्यानं खूप धडपड करूनही तें नीट बसत नाहीं. नाइलाज होऊन ती सांगते.)*

**नलू :** येत नाहीं मला बांधतां!

**माधव :** थांब, मी बांधतों.

*(ती जवळ जाते. माधव घड्याळ बांधतो. तसाच तिचा हात हातांत घेऊनं तिचीं बोटें आपल्या बोटांत गुंफतो, हळुवारपणें कुरवाळतो. त्या पहिल्या स्पर्शानें नलू शहारते, लाजते, गोंधळते. खालीं मान घालून उभी रहाते. तारा पुढें येते, दृश्य पाहून थबकते...तो नाजुक प्रणय—ती कोवळी लज्जा—जें तिच्यापासून फार फार दूर गेलें आहे तें सारें पाहून वायाळ होते. झपाट्यानें आंत निघून जाते. थोड्या वेळांत नलू आपला हात सोडवून घेते.)*

**माधव :** आवडलं घड्याळ तुला?

**नलू** : खूप!

**माधव** : आणि मी आवडलों?

**नलू** : खूप!

**माधव** : *(कावेबाजपणानें)* घड्याळाइतकाच?

**नलू** : *(चटकन)* अंहं....

**माधव** : *(तोच सूर)* मग घड्याळाहूनही कमी?

**नलू** : *(भारावून)* अंहं, घड्याळाहून, आत्तापर्यंत मिळालेल्या सगळ्या सगळ्या गोष्टींहून...माझ्याहूनसुद्धां खूप खूप जास्त!...

*(आनंद नि सुख अनावर होऊन तिच्या डोळ्यांत पाणी येतें.)*

**माधव** : *(एकदम गोंधळून)* वेडी, ए वेडी, हें काय? हें काय? असं पाणी कशासाठीं?

*(बाळ केस पुसत येतो. नुकतीच त्यानें आंघोळ केली आहे. माधव नलूला समजावतो आहे. नलू हंसत डोळे पुसते आहे.)*

**बाळ** : Oh! Very sorry to have disturbed you!

*(माधव-नलू दचकतात. दूर होतात.)*

**बाळ** : मी तेवढी तेलाची बाटली घेऊन आंत जातों. तोंवर माफ करा हं...

**नलू** : *(रुसव्यानें)* इश्श, हें रे काय बाळ?

**बाळ** : माझं कुठं काय? तुझंच हें 'कांहीं तरी' चाललं आहे. *(माधवला उद्देशून)* माफ करा बरं कां. तुमच्या 'ह्यां'त व्यत्यय आणायचा हेतु नव्हता माझा...पण त्याचं असं आहे, आमच्या घरांत हा—रोमान्सचा—प्रश्न कधीं उद्भवलाच नव्हता...आतांआतांशाच जरा जरा तो डोकं वर काढूं लागला आहे. माझ्या दोन्ही मोठ्या बहिणींना पातळाच्या पहिल्या जोडीबरोबरच नवरे आणून दिले गेले...बरं, ताराताई म्हणजे उरलेल्या सर्व भावंडांत वडील, नोकरी करणारी...घरांतल्या कर्त्या पुरुषासारखीच! तेव्हां तिला हें असलं कांहीं करायला कधीं सवडच सांपडली नाहीं. राहतां राह्यलों आम्ही......ते हे असे फटिंग —कलंदर—बेकार!...

*(माधव चकित होऊन ऐकतच राहिला आहे.)*

**नलू :** हा माझा भाऊ. बाळ म्हणतों आम्ही त्याला.

**बाळ :** *(माधवला)* अरे हो! म्हणजे आपली ओळख व्हायचीच आहे नाहीं का अजून?...नमस्कार!

**माधव :** नमस्कार!...काय करतां आपण?

**नलू :** शिकतोय तो, कॉलेजांत!

**बाळ :** *(आश्चर्यानें)* कोण, मी?

**माधव :** *(बाळच्या वयाचा अंदाज घेऊन)* काय, यंदा एम्. ए. कीं एम्. एस्सी.?

**नलू :** नाहीं, यंदा इंटरला बसायचाय् तो.

**बाळ :** हो, म्हणजे मॅट्रिक होऊन पांचसहा वर्षे झालीं तशीं मला. पण पहिलीं दोनतीन वर्षे कुठं बारक्यासारख्या नोकऱ्या करण्यांत गेलीं...नंतर जेव्हां तसलंहि काम मिळेना, तेव्हां कॉलेजांत नांव घातलं झालं!...वेळ जायला तेवढंच एक निरुपद्रवी साधन!—By the way तुमचं शिक्षण किती झालंय्?

**माधव :** मींही इंटरनंतर कॉलेज सोडलं. म्हणजे ही शेतकी खात्यांतली नोकरी आयतीच चालून आली...

**बाळ :** आणि कॉलेज सोडून तुम्ही ती पकडली, असंच ना? That was very wise of you! अहो, नोकरी मिळवायला म्हणून शिकायचं–तीच जर...

*(तारा येते. सारें स्थिरस्थावर झालेलें पाहून प्रवेश करते. तिनें साडी वगैरे बदललेली आहे. थोडीशी ताजीतवानी दिसते आहे.)*

**तारा :** हें काय नलू? हे आल्याचं सांगितलंही नाहींस आम्हांला आंत...

**नलू :** मीं कितीतरी हांका मारल्या...

**बाळ :** मनांतल्या मनांत!

**नलू :** होय बाबा, तूं म्हणतोस तेंच खरं! *(माधवला उद्देशून)* हिची न् तुमची तशी थोडीशी ओळख झालेलीच आहे. ही ताई आमची.

**तारा :** नमस्कार.

**माधव :** नमस्कार. *(नलूला)* कलेक्टर कचेरींत नोकरी करतात त्या याच ना?

**बाळ :** याच! यांच्याच जिवावर आम्ही दुसऱ्यांच्या श्रमावर जगणाऱ्या priviledged class चे फायदे उपभोगतों!

**तारा :** *(माधवला)* आमचा बाळ आहे जरा तिरकट डोक्याचा न् अफाट जिभेचा. हुशारही आहे म्हणा...

**बाळ :** Thanks.

**नलू :** मघांपासनं त्यानं केलेल्या बडबडीवरनं त्यांच्या लक्ष्यांत आलंच असेल सारं!

**बाळ :** *(बजावीत)* नले...असा सूड घेणं बरं नव्हे.

**नलू :** कुणापुढं काय बोलावं तें कळायला हवं माणसाला.

**माधव :** *(बाळाला सावरून घेत)* स्वतःचीं, स्वतंत्र मतं असलेलीं माणसंच मला आवडतात.

**तारा :** आतां एक माणूस आवडल्यावर त्याचीं बाकीचीं सगळीं माणसं चांगलीं वाटणारच!

**नलू :** *(ताराला)* म्हणजे माझीं माणसं वाईट आहेत वाटतं?

**बाळ :** तुला आतां काय वाटेल तें आवडायला लागेल ग!

**तारा :** बाळ, पुरे कर. जा, आईला बोलावून आण. यांना येऊन इतका वेळ झाला नि तिला आंत ठाऊकही नसेल!

**बाळ :** किती वेळ झाला ग नले यांना येऊन? हातावरचं तेवढं घड्याळ पाहून सांग ना!

**तारा :** *(पहिल्यांदाच पाहिल्यासारखें करून)* अय्या! नलू, छान, तूंही दाखवलं नाहींस नि माझ्याही...

**माधव :** त्यांत एवढं मुद्दाम दाखवण्यासारखं काय आहे?

**बाळ :** फार आहे. तुम्हांला कल्पना नाहीं येणार, पण तुमचा पाडाव होऊं लागल्याची, गळ जड झाल्याची पहिली निशाणी आहे ती! खरं म्हणजे निशाणा-सारखा हात फडकावीतच नलूनं चालायला हवं आहे!

**तारा :** सुंदरच आहे हं घड्याळ—छान आहे. *(नलूला)* आहे बुवा एका माणसाची! साडी काय, घड्याळ काय!

**नलू :** हें ग काय ताई!

**बाळ :** *(तारानं जरा ठीक वेष केला आहे त्याच्याकडे रोख)* आणि ताई, तुझ्याकडे पाहूनही आज वेगळंच कांहीं तरी वाटतंय्! तुझंही 'कुणी' यायचं आहे कीं काय?

**आई :** *(प्रवेश करीत; तिच्या डोक्यांतून अजून विश्वनाथ गेलेला नाहीं.)* अग तारे, विश्वनाथ केव्हांसा येईल म्हणाला होता? *(माधवला पाहून)* हें काय? तुम्ही!

*(माधव उठून अदबीनं नमस्कार करतो, बसतो.)*

**आई :** केव्हां आलां कांहीं कळलंही नाहीं मला!

**तारा :** नलूनं गुंतवून ठेवलं होतं ना त्यांना.

**बाळ :** हो, आपण डोळ्यांनीं पाह्यलं बुवा प्रत्यक्ष!

**नलू :** *(दटावीत)* बाळ, आई आली आहे त्याची तरी शुद्ध ठेव!

**बाळ :** बरं बुवा राह्यलं...म्हणजे मी चुकून या खोलींत आलों तेव्हां तुम्ही—

**नलू :** *(ओरडून)* बाळ्या...बघ ग आई!

**आई :** गप् बैस रे. त्रास नको देऊं तिला!

**बाळ :** राह्यलं—सध्यां तुमचे दिवस आहेत चि. सौ. कां. नलिनीबाई!

*(विश्वनाथ प्रवेश करतो. तारा त्याला पाहून दचकते. थोडा रोषही. तो आहे तोंवर ती आंखडूनच बसलेली आहे. बोलायचंही टाळते आहे.)*

**विश्वनाथ :** नमस्कार मामी, ओळखलंत का?

**आई :** कोण, अगबाई, विश्वनाथ का?...किती बदललायस रे? ओळखूंही आला नाहींस पहिल्यांदा! ये...बरं झालं आलास तें. तारी आत्तांच सांगत होती कीं तूं मघाशींच तिला वाटेंत भेटला होतास म्हणून.

*(विश्वनाथ ताराकडे आश्चर्यानें पहातो. तारा त्याच्याकडे पहातही नाहीं.)*

**विश्वनाथ :** *(सारवासारवी करत)* हो, तुम्हांला भेटायला कधीं येऊं म्हणून विचारायचं होतं.

**आई :** आम्हांला भेटायला असं अगदीं ठरवून कशाला यायला पाहिजे?

**विश्वनाथ :** तेंही खरंच. तरी पण सगळीं माणसं घरीं असतील अशा वेळींच आलेलं बरं, म्हणून विचारलं!

**आई :** पण ताराला कांहीं तुला बोलवायचं सुचलं नसेल!...येईल म्हणाली त्याला वाटेल तेव्हां. पोरपगा गेला नाहीं तिचा अजून! निदान तूं तरी इतकं लांबचं, मावसचुलत नातं लक्ष्यांत ठेवून आलास म्हणजे विशेषच म्हणायचं!

**विश्वनाथ :** विशेष काय? लहानपणीं, आम्ही बंगलोरला जायच्या आधीं, रोज इथंच मुक्काम असे ना माझा मामी?

**आई :** पण लहानपणचं मोठेपणीं टिकत नाहीं! बरं, माणसं बरीं आहेत ना सारीं? बनूवन्सं, मुलंबाळं! इथं कोणकोण आलं आहे!

**विश्वनाथ :** मीच फक्त.

**आई :** लग्नबिग्न केलंस कां?

**विश्वनाथ :** लग्न ना? करूं कीं सावकाश. काय घाई आहे?...*(किंचित् बाचकत)* तारा, ही कोण?

**आई :** अरे, ही नलू नाहीं का आपली?

**विश्वनाथ :** ओहो! नलू का ही? ओळखूं न येण्याइतकी सुंदर झालीय्!

**आई :** अन् हे बाळोबा!

**बाळ :** हो, मी बाळ. ताराचा भाऊ. मीही ओळखूं न येण्याइतका उंच, राकट झालों आहें!

*(विश्वनाथची वेळोवेळीं तिच्यावर स्थिरावणारी नजर असह्य होऊन नलू आंत जायला लागते. पाठोपाठ ताराही.]*

**आई :** चला ग—फराळाची, चहाची कांहीं तयारी करूं या!

**बाळ :** आई, नलूनं आंत यायलाच पाहिजे का?

**विश्वनाथ :** माझीसुद्धां तीच तक्रार आहे.

*(त्यांच्याकडे लक्ष न देतां तिघीही जातात)*

**बाळ :** *(विश्वनाथची नलूवर खिळलेली 'रसिक' नजर याच्या लक्षांत आलेली आहे. विश्वनाथाला वेळींच ताळ्यावर आणण्याच्या उद्देशानें)* म्हणजे

त्याचं असं आहे बरं कां विसूभाऊ, कीं हे माधवराव आले आहेत खास नलूशीं गप्पा मारायला!

**माधव :** छे छे!

**बाळ :** त्यांतून मघांशीं ते नलूशीं बोलायचा क्रियाशील प्रयत्न करीत होते तर मी कडमडलों मध्येंच.

**माधव :** उगीच गैरसमज करून घेतला आहे तुम्ही. आणि लोकांचाही करून देतां आहांत.

**विश्वनाथ :** म्हणजे, आहे काय भानगड ही?

**बाळ :** भानगडबिनगड नाहीं हो कांहीं. भानगडी करायचा मक्ता आम्हीं तुमच्यासारख्यांना दिला आहे. *(थोडासा दचकून विश्वनाथ त्याच्याकडे पहातो. बाळ कांहीं न झाल्यासारखा बोलतच रहातो.)* त्याचं असं आहे कीं हे माधवराव नलूवर प्रेम करूं इच्छितात.

**विश्वनाथ :** प्रेम?

**बाळ :** विवाहोत्तर!

**विश्वनाथ :** असं असं! *(त्याच्या बोलण्याचा आशय एकदम लक्षांत येऊन)* असं का? Congrats! *(माधवला)* फार चांगली पोरगी पटकावलीत बुवा तुम्ही. Congrats!

**माधव :** *(गोंधळून)* Thanks.

*(विश्वनाथ सिगरेटचं पाकीट काढून बाळला ऑफर करतो. तो एक सिगरेट घेऊन खिशांत टाकतो. माधव "अं हं, मी ओढत नाहीं" म्हणून सांगतो. विश्वनाथ सिगरेट पेटवून ओढूं लागतो.)*

**बाळ :** बरं का माधवराव, मघांशीं मी जो privileged class सांगितला ना, त्याचे हे सन्माननीय सभासद आहेत. यांच्या वडिलांनीं म्हणजे आमच्या मावस-चुलत का चुलतमावस आत्याच्या यजमानांनीं कॉन्ट्रॅक्टरचा धंदा करून बरीच माया जोडून ठेवलेली आहे. यांच्याशीं ओळख असलेली फायद्याची!

**विश्वनाथ :** *(माधवला)* आपलं नांव?

**माधव :** माधव आगाशे. शेतकी खात्यांत नोकरीला असतों मी.

**विश्वनाथ :** भाग्यवान् आहांत!

**माधव :** तो कसा काय?

**बाळ :** *(उपरोधानें)* महिन्याकांठीं पुरेपूर ८०–५–१२० मिळतात ना तुम्हांला! सामान्य माणसांना फार झाली एवढी कमाई! खरंच विसूभाऊ—तुझा सिगरेट-सिनेमांचा वरखर्चच दीडशेंच्या आसपास असेल नाहीं.

**विश्वनाथ :** *(बेफिकीरपणें)* सहज! अरे नुसत्या दीडशेनं काय होतं आहे सध्यां? जरा बऱ्यापैकीं जेवण घ्यायचं म्हटलं कीं पंचवीसच्यावर जातात एका वेळेचे!

**माधव :** एकट्याचे?

**विश्वनाथ :** *(हंसतो)* छे हो, एकट्यानं जाण्यांत काय मजा आहे अशा ठिकाणीं? असलं कांहीं करायचं म्हणजे कंपनीचेच पांचदहा गेले तरी कांहीं वाटतां कामा नये.

**माधव :** असं असतं तरी कोण तुमच्याबरोबर?

**बाळ :** पैसे खर्चणारा सांपडला कीं कंपनी मिळायला काय तोटा! साधी चार आण्यांची भेळ द्यायची तयारी दाखवली तर दहा मित्रांचा तांडा गोळा होतो भोंवतीं. मग विसूभाऊसारखा handsome, उदार नि रसिक दाता सांपडल्यावर तर...

**विश्वनाथ :** छे रे, पोरींच्यांत दानतच उरलेली नाहीं बघ आतांशा! सगळ्यांचाच थाट प्रिन्सेस मार्गारेटच्यावर!...म्हणजे होतं काय कीं पैसे जाऊनच्या जाऊन कंपनी मात्र...*(माधवला)* त्याच दृष्टीनं मघाशीं मीं तुम्हांला भाग्यवान म्हटलं होतं!

**माधव :** माझ्या नाहीं लक्ष्यांत आलं तुम्हांला काय म्हणायचं आहे तें!

**बाळ :** त्यांचा या विषयावरचा मघांचाच गोंधळ अजून तसाच कायम आहे!

**विश्वनाथ :** *(माधवला.)* तुम्ही तर फारच सोंवळेपणाचा आव आणतां आहां बुवा! ज्या खात्यांत तुम्ही नोकरी करतां त्यांतल्या महत्त्वाच्या गोष्टी तुम्हांला माहीत नाहींत? आश्चर्य आहे!

**माधव :** हें पहा, मी आहें साधा कारकून. आमच्या अधिकाऱ्यांना माहीत असायच्या...

*(विश्वनाथ 'काय बोलायचं आतां!' अशा अर्थानं खांदे उडवतो.)*

**बाळ :** बरं का विसूभाऊ, कांहीं माणसंच अशीं कमनशिबी असतात कीं त्यांना पैसा मिळवायला ऑफिसांत जावं लागतं...

**विश्वनाथ :** मग?

**बाळ :** ऑफिसांत गेल्यावर चक्क काम करावं लागतं. आणि काम करायचं असल्यामुळं बऱ्याचशा 'मनोरंजक' गोष्टींकडे लक्ष द्यायला सवडच मिळत नाहीं त्यांना.

**विश्वनाथ :** तरी पण...

**बाळ :** नलिनी राजे न् माला जयवंतसारख्या beauties ची माहिती....

**विश्वनाथ :** बघ तुलासुद्धां त्या माहीत आहेत!

**बाळ :** तुझ्याबरोबरच त्यांना पाह्यलं होतं मी···आजसुद्धां....

**विश्वनाथ :** *(कौतुकानें)* परदेशांत हेर म्हणून नेमलं तर चांगलं काम करशील तूं!

*(आंतन हांक येते: बाळ, ये रे त्यांना घेऊन)*

**बाळ :** आलों आलों—पण मीही यायचं आहे कां? *("काय वात्रट मुलगा आहे." आंतून उत्तर)* बरं बरं आलों. चला माधवराव, विसूभाऊ...आपली गरीबाघरची मीठभाकर का काय म्हणतात ना?

*(माधव व बाळ जायला निघतात. विश्वनाथ उठतो, पण बूट काढायला थांबतो.)*

**विश्वनाथ :** तुम्ही व्हा पुढं. मी आलोंच. पाटावर बसायचं असेल ना? बूट काढून येतों.

*(माधव व बाळ जातात. विश्वनाथ बूट काढून आंत जायला वळतो आहे, तोंवर तारा हळूंच येऊन कपाटाकडे जाते. विश्वनाथच्या नकळत तिला येऊन कपाटांतलें कांहीं घेऊन जायचें आहे. पण थोडा आवाज होऊन त्याचें लक्ष तिच्याकडे जातेंच.)*

**विश्वनाथ :** *(नाटकी आवेगानें)* तारा!

*(तारा व विश्वनाथ अशा दोघांचाच हा प्रवेश आहे. मुलींना—आपण संपूर्णपणें अलिप्त राहून—नादीं लावण्यांत, त्यांना खुलवण्या—फुलवण्यांत पटाईत असलेला असा हा तरुण आहे. त्याच्या वागण्यांत मुलींना प्रथमदर्शनीं सहज भाळायला लावील असा नाटकीपणा आहे, पण नाटकीपणाच्या आड जो खोटेपणा असतो त्याला लपवण्यांत आतां तो सरावानें पटाईत झाला आहे. तारानें आजवर स्वत:ला प्रेम करण्याचें सौख्य लाभूं दिलेलें नाहीं. आतां मात्र इतक्या उशीरां आलेल्या या प्रेमाचा जीव तोडून स्वीकार करायचा असें तिनें ठरवलेलें आहे. तिच्या बोलण्यावागण्यांतला उत्कट आवेग—किंचित् विकृत वाटावा इतका उत्कट आवेग—व विश्वनाथाचा नाटकीपणा यांतला फरक स्पष्ट दिसून येतो. विश्वनाथनें 'तारा!' अशी हांक मारल्यावर देखील तारा रोषानें आंत जायला निघते. त्याच्याशीं न बोलतांच. एकदोन पावलें ती टाकतेही. पण आतां तिच्या वाटेंत विश्वनाथ उभा आहे.)*

**विश्वनाथ :** तारा!...एवढा तुला भेटायला म्हणून मी घरीं आलों...पण गरीबाशीं तूं एकादा शब्दही बोलली नाहींस!

*(तारा थोडी विरघळते. थांबते.)*

**तारा :** *(रागानें)* काय बोलायचं?

**विश्वनाथ :** रागावलीस?

**तारा :** कुणावर?

**विश्वनाथ :** दुसऱ्या कुणावर? ताराराणीच्या राज्यांत कोप व्हायचा एकाच व्यक्तीवर!

**तारा :** तुझ्यावर रागवायचा मला काय अधिकार?

**विश्वनाथ :** मग कुणाला?

**तारा :** मला काय माहिती?

**विश्वनाथ :** च्च्. तुझा एवढा राग झाला तर मी पाहूं तरी कोणाकडे?

**तारा :** त्याची नाहीं काळजी पडणार तुला!

**विश्वनाथ :** *(नाटकीपणानें गंभीर होत)* तसं असतं तर तुझ्यासाठीं असा तडफडलों, तळमळलों नसतों मी ! माझा मलादेखील माझ्या या तळमळण्याचा अर्थ लागेनासा झालाय्, तारा! सगळ्यांनाच त्याचं आश्चर्य वाटतं—मलाही कांहीं समजत नाहीं हें असं कां होतंय् तें. आजसुद्धां—अगदीं आत्तांपर्यंत—विद्या कॉलेजच्या आवारांत एकाकीपणानं तिष्ठत राह्यलों होतों तुझ्यासाठीं मी. पण...तुला कशाला राहील आठवण? तूं आपली सरळ घरींच आलीस !

**तारा :** *(चिडून)* बस्स कर हा कांगावखोरपणा! विद्या कॉलेजच्या आवारांत डोळ्यांत प्राण आणून वाट पहात तासभर तिष्ठत उभी होतें मी, तूं नव्हे! तुझ्या प्रेमाच्या अभिनयावर विश्वास ठेवून तळमळतं तडफडतं ती मी, तूं नव्हे. *(हताशपणें)* मला माहीत आहे सारं—माहीत आहे.

**विश्वनाथ :** जरा उशीर झाला कुठं मला, तर एवढा गहजब?

**तारा :** जरा उशीर झाला म्हणे! इकडे एकेक मिनिट युगासारखं वाटत होतं मला...कधीं न संपणाऱ्या युगासारखं! नि तुझ्या गणतींत पुऱ्या तासाचाही हिशेब नाहीं !

**विश्वनाथ :** झाला खरा उशीर, *(सबबी शोधीत)* मित्रांच्या घोळक्यांत असा अडकलों मी कीं अगदीं नाइलाजच झाला बघ माझा! ते सोडतां सोडेनात. अगदीं गयावया, आर्जवं केलीं तरी सोडेनात. त्यांतून तुझं नांव सांगून सटकूं शकलों असतों मी, पण तुलाच तें आवडलं नसतं, खरं ना?

**तारा :** *(भावनावश होऊन)* केवढ्या आशेनं वाट पाहिली मीं! ऑफिसांतनं लौकर निघालें, लगबगीनं गेलें नि आपल्या बुचाच्या झाडाखालीं थांबलें. माझ्या आधींच कदाचित् तूं तिथं गेला असशील अशी आशा जातांना बाळगली. अन् नसला गेलास तरी तुला उत्सुक होऊन येतांना पहावं...तुझी उत्कंठा...मी तिथं असेन कीं नाहीं याची चिंता...दुरून पहावी...आणि एकदांचा तूं भेटल्यावर मनावरचं सारं ओझं तुझ्यावर टाकून हलकं व्हावं...पिसासारखं, शिरीषाच्या फुलासारखं हलकं व्हावं असं वाटत होतं!...पण तूं आलाच नाहींस...आलाच नाहींस. तुझ्या लक्ष्यांतच कांहीं आलं नाहीं...माझं ओझं...माझी ओढ! सारं माझ्यापाशींच राहिलं. शिणून भागून, निराश हताश होऊन मी घरीं परत आलें.

*(व्याकुळ)* विश्वनाथ...मला कांहीं समजत नाहीं रे....मला फक्त भीति वाटते— भीति वाटते!

**विश्वनाथ :** माझी!

**तारा :** तुझी नाहीं रे, माझी...माझी! कसं सांगूं तुला? इतके दिवस जीव खाऊन सांवरलेला तोल तुझ्या एखाद्या इशाऱ्यासरशीं सुटेल कीं काय—विश्वनाथ, आज सहा महिने तुझ्याबरोबर मी हिंडतेंय्, तुला वेळींअवेळीं भेटतेंय्...पण अजून वाटतं कीं तुझी न् माझी साधी ओळखही झालेली नाहीं. कधीं तूं एक-दम अनोळखी, परका होऊन जाशील तेंच सांगवत नाहीं. खरंच रे, कधीं नीट सांगशील का तूं मला असा कां भेटतोस, वेळीं अवेळीं कां निरोप पाठवतोस, मी सांगेन त्या ठिकाणीं मी येईपर्यंत कां तिष्ठत उभा रहातोस? असा भेटतोस, तसं बोलतोस नि असं वागतोस! कां हें सारं? कां? माझ्या जिवाशीं तुझा खेळ चाललाय् हें तुला कळत नाहीं का?...*(असहायपणानं)* असले खेळ खेळायची संवय नाहीं रे मला!

**विश्वनाथ :** पागल आहेस तूं, पुरती पागल! एक दिवस मी भेटलों नाहीं तर इतका त्रास करून घ्यायचा? छोड दो ते सारं! विसरून जा. वेडी...साफ वेडी! ...आतां तर मी आलोंय् ना? इकडे ये, हें बघ काय आणलंय् तुझ्यासाठीं मीं! अंहं, असं रुसून नाहीं...रुसलेली तारा not wanted! हीं बघ, उद्यांच्या शोचीं तिकिटं रिझर्व्ह केलींत मीं! किती आहेत? दोनच ना? बस्स, दोनच! तूं नि मी. उद्यां मित्राबित्रांची मिजास नाहीं चालूं देणार! ऑफिसमधनं तुला लौकर सोड म्हणून डिसूझाला सांगून आलोंय्! आणि हें बघ काय आहे तें. come on, come on!

*(तारा त्याच्याजवळ जाते. राग वितळत आला आहे.)*

**तारा :** *(उत्सुकतेनं)* काय आहे?

**विश्वनाथ :** बघ ना तूंच!

**तारा :** *(ओळखत)* सेंट!

**विश्वनाथ :** हं! वास तर घे...अशी जादू आहे त्या अत्तरांत कीं रागबीग सारा उडून जातो अन् भोळ्याबिचाऱ्या विश्वनाथवर प्रेम बसतं.

**तारा :** *(ऊर भरून वास घेते.)*

**विश्वनाथ :** नांव काय आहे अत्तराचं ठाऊक आहे?

**तारा :** *(वाचते)* Mischief.

**विश्वनाथ :** (mischievously) Mischief आणली आहे तुझ्यासाठीं मीं! खोडी, खोडकर मस्ती...*(बाटलीचं बूच काढून सेंट तिच्या अंगावर शिंपडतो, ओततोच.)* कसं काय वाटतंय्?

**तारा :** *(अगदीं फुलून येऊन)* छान—छान वाटतंय्—अगदीं पहिला पाऊस अंगावर पडल्यासारखं! *(एकदम भित्री होत)* पण विश्वनाथ, आपण दोघंच सिनेमाला गेल्याचं आईला कळलं तर?

**विश्वनाथ :** मग, कळेना कां? कुणाची चोरी आहे?

**तारा :** *(लाजून)* तसं नाहीं रे...

**विश्वनाथ :** हें बघ, माझ्या मनांत एकदां एखादी गोष्ट आली कीं तुझी आई किंवा माझे वडील आडवे येऊं शकत नाहींत! *(या बोलण्याचा आपल्याला हवा तसा—म्हणजे आपल्या लग्नासंबंधींचा—अर्थ धरून तारा मोहरून येते.)* ...अन् माझ्यापेक्षां या इतर लोकांची जास्त कदर वाटते तुला?

**तारा :** नाहीं रे, पण उगीचच कांहींतरी मनांत येतं.

**विश्वनाथ :** उगीचच ना? का अजून या बंदा गुलामाबद्दल शंका आहे तारा-राणीच्या मनांत? तसं असलं तर, तारे, हृदय फाडून—

**तारा :** *(घाईनें)* कांहींतरीच बोलूं नकोस विश्वनाथ. मला माहीत आहे, तुझं माझ्यावर खूप खूप प्रेम आहे! तूं मला अगदीं सुखांत ठेवशील, फुलासारखी! विशू—

*(त्याच्या खांद्यावर प्रेमभरानें हात ठेवते. विश्वनाथही तिला थोडी जवळ घेणार, एवढ्यांत आई येते.)*

**आई :** *(थोडा राग, थोडं कौतुक)* तारे—

*(तारा कांहींच न बोलतां लाजून हात काढून घेते. घाईघाईनें. विश्वनाथ चकित होऊन उभा असतांनाच—)*

**पडदा पडतो.**

# अंक दुसरा

*स्थळ : पहिल्या अंकांतलीच खोली. मध्यंतरींच्या काळांत नलूचें लग्न झाल्यामुळें घराला रंगसफेती करून घेतली आहे. तिच्यांतल्या एकुलत्या एका जुन्या आरामखुर्चीत माधव त्यांतल्या त्यांत आरामांत पडला आहे. एकटा असल्यामुळें त्यानें करमणुकीसाठीं एखाद्या मासिकाचा अंक घेतला आहे वाचायला. वेळ संध्याकाळची.*

*नलू घरांतून प्रवेश करते. नुकतेंच लग्न झाल्याच्या खुणा—हिरवा चुडा, मंगळसूत्र, कोरीच साडी—तिच्या अंगावर दिसत आहेत. आतां माधवशीं वागतांना ती पहिल्या अंकांतल्याइतकी लाजत बुजत नाहीं. दारांतच थबकून ती क्षण दोन क्षण माधवला प्रेमानें न्याहाळते. मग पुढें येऊन बोलायला सुरवात करते.*

**नलू :** काय जांवईबोवा?

**माधव** *(एकाकीपणा संपल्यामुळें सुटकेचा निःश्वास टाकून)* बोला!

**नलू :** कंटाळून गेलांत ना अगदीं?

**माधव :** *(खोटेंच)* तें कशानं बुवा?

**नलू :** कशानं काय? एकाच जागीं सारखं रहायचं म्हणजे...

**माधव :** वाचत तर पडलों होतों मी चांगला.

**नलू :** *(आपलेंच बोलणं पुढें चालू ठेवीत)* पण करणार काय? तेवढी एकच आरामखुर्ची आहे लोकांना बसायला देण्याजोगी!

**माधव :** अजून मी लोकच का?

**नलू :** घरांतल्या माणसांना तरी!

**माधव :** *(रुसव्यानें)* येताहेत कुठं घरांतलीं माणसं आमची चौकशी करायला?

**नलू :** कोण येणार? ताई ऑफिसांत, नाहीं तर फिरायला गेलेली, न् बाळचं तुम्हांला माहीतच आहे कसं चालतं तें!

माधव : आणि उरलेल्यांचं काय?

ल्लू : उरलों आई न् मी. त्यांतली आई कांहीं जांवयाशीं गप्पा मारीत बसेलसं
ला वाटत नाहीं...अन् आम्ही कसं यायचं?

माधव : कां?

ल्लू : घरांत आई असतांना असं मीं बाहेर येऊन बोलत बसणं बरं
देसतं का?

माधव : म्हणून कुणी आलं तर त्याला एकटंच ठेवायचं वाटतं?

ल्लू : मी वाटच पहात होतें आई कुठं जातेय का त्याची. आत्तांच गेली
ी शेजारीं.

माधव : कशाला?

ल्लू : दुसरं काय? सध्यां नवे जांवई अन् ताराताईचं ठरलेलं लग्न यांचं
र्णन करण्याखेरीज दुसरं कांहीं सुचतंय् का तिला?

माधव : एवढं काय चालतं नव्या जांवयांबद्दल बुवा?

ल्लू : *(नक्कल करीत)* आमचे नवे जांवईबुवा किनई मुळींच मिजासखोर
ाहींत हो! इतका साधा न् सरळ स्वभाव कुठं पाहिला नव्हता हो! लग्नांतसुद्धां
ांहीं म्हणतां कांहीं त्रास दिला नाहीं त्यांनीं--नाहींतर असतात एकेक...

माधव : पण खोटंच ना सारं?

ल्लू : *(हसून)* तर काय?

माधव : *(थट्टेनें)* पण आतां काय करायचं? आहे तसा नवरा चालवून घेतला
ाहिजे! पदरीं पडलं न् पवित्र झालं.

ल्लू : *(गंभीर होत)* खरं म्हणजे तुम्हींच म्हणायला पाहिजे असं! इतकं
चांगलं घर, अशीं प्रेमळ माणसं मिळतीलसं वाटलं नव्हतं मला!......चार
देवस होतें मी सासूबाईच्या हाताखालीं, पण त्यांनीं कांहीं माहेर सोडून मी
ासरीं आलेयूसं वाटूं दिलं नाहीं मला!

माधव : सासूबाईनीं विचारलंयू केव्हां येतेय सूनबाई घरीं म्हणून!

ल्लू : आमचं काय? आपण आज्ञा केली कीं......

**माधव** : चल मग आजच!

**नलू** : पण आईचं म्हणणं चाललंय् कीं थांब थोडे दिवस आलीच आहेस तर!

**माधव** : (खट्टू होऊन) तुला रहायचंय्?

**नलू** : तसं नाहीं. पण ताराताईचं लग्न झाल्यावरच आलें असतें म्हणजे...

**माधव** : तेंही खरंच आहे म्हणा!

**नलू** : पण तिच्या लग्नाची तारीख कुठं ठरलीय् अजून!

**माधव** : केव्हां ठरणार?

**नलू** : काय सांगावं? केव्हांही करील ती लग्न. रजिस्टर करणार आहे म्हणे. म्हणजे मुहूर्तासाठीं कांहीं थांबायला नकोय्!

**माधव** : नोटीस दिलीय्?

**नलू** : नाहीं वाटतं.

**माधव** : म्हणजे इतक्यांत लग्न करायचा बेत दिसत नाहीं.

**नलू** : काय आहे तिच्या मनांत कोण जाणे!

**माधव** : विचारून घ्यायचं होतंस एकदां.

**नलू** : सध्यां माझ्याशीं बोलायला सवड कुठं असते तिला? सकाळीं उठल्यापासनं तिची ऑफिसची घाई, संध्याकाळीं ऑफिसमधनं परस्परच घेऊन जातो विसूभाऊ तिला! मग फिरायला जाणं, खरेदी...प्रेझेंट्सचा वर्षाव!

**माधव** : हेवा वाटत असेल तुला, नाहीं?

**नलू** : कां, माझ्या माणसांनीं काय कमी केलंय् मला?

**माधव** : आम्हीं अगदीं कितीही मनांत आणलं तरी त्यांची श्रीमंती कुठं आहे आमच्याजवळ ?

**नलू** : नसेना कां ? त्यांची श्रीमंती त्यांच्याजवळ ! आपल्याजवळ आहे तेंही कांहीं कमी नाहीं. विसूभाऊ ताईला रोज फिरायला घेऊन जातोय्, तिला हवं तें घेऊन देतोय्, कधीं नव्हे ती तिची हौस पुरविली जातेय्, यांतच आनंद आहे मला !

**माधव** : असं का आजीबाई ?

**नलू :** तुम्हीं तिला याच्याआधीं पाहिली नव्हतीत फारशी. कशी खुरटल्यासारखी, कोळपल्यासारखी दिसायची ! नीट बोलणं...हंसणं...गाणं...नटणं कांहीं माहीतच नव्हतं तिला ! सारखी आम्हां सगळ्यांची जबाबदारी, कामं, चिंता न् थकवा ! आतां आतांशाच जरा फरक दिसायला लागलाय तिच्यांत. खूप दिवस कुचंबून राहिलेली कळी हळू हळू, एकेक पाकळी उलगडत उमलावी...तशी दिसायला लागलीय ती. आतां थोडी नटते, थट्टा करते...परवा तर मीं चक्क तिला शीळ घालतांना ऐकलं !...गंभीर व्हायची संवय तिची एकदमच कशी जाणार म्हणा !! ...पण एकदां लग्न झालं न् नवरा भोंवतीं पिंगा घालायला लागला म्हणजे....

**माधव :** माझ्यासारखा ना !

*(आई येते. मुलगी-जांवयांकडे पाहून कौतुक.)*

**आई :** कसल्या ग गप्पा चालल्याहेत एवढ्या ?

*(माधव सांवरून बसतो. आई उभीच.)*

**माधव :** विशेष कांहीं नाहीं. या ना !...*(आईला उभीच पाहून)*...बसा ना.

**आई :** *(पूर्वीच्या बायका जांवयांशीं एखादा शब्दही बोलत नसत. मग त्याच्यापुढें येऊन बसणें दूरच.)* असे ना कां ?

**माधव :** *(उठून उभा राहतो.)* मग माझा उभा सत्याग्रह. तुम्ही बसेपर्यंत मीं बसणार नाहीं आई ! कसल्या रीतीभाती घेऊन बसलांय आई ! मी कां आतां कुणी परका आहे ?

**आई :** *(संकोचानें)* तसं नाहीं. पण आमच्या मनाला अजून गैर वाटतात या गोष्टी—जांवयासमोर बसणं, बोलणं...*(बसते.)*

**माधव :** तुम्हीं अशा वागणार असाल—परकेपणानं, शिष्टाचारानं तर मला आत्तांच गाशा गुंडाळायला हवा !

**नलू :** जसं कांहीं लौकर परत जायला नकोच आहे !

**माधव :** *(नलूला)* आपण निघालांत कीं आम्ही आलोंच आपल्या पाठोपाठ !

**नलू :** तर तर !

**माधव :** *(बसत, आईला)* काय मग, केव्हां पाठवतांय् लेकीला ?

**आई :** केव्हांही घेऊन जा कीं ! आतां ती थोडीच आमची राहिलीय ?

**माधव** : तरी पण...

**आई** : एकदां हें ताईचं कार्य होऊन गेल्यावर नेली असतीत म्हणजे...

**माधव** : पण कार्याच्या आधीं पाठवू ना तिला तुम्ही म्हणाल तितके दिवस! गांवांतच तर आहे. तुम्हीं निरोप पाठवायचा अवकाश कीं लगेच...

**आई** : *(चिंतेचा सूर)* खरं सांगू?......तारीचं लग्न नीट पार पडेपर्यंत माझ्या जिवाला चैन नाहीं पडायचं .....तोंवर कुणीतरी सारखं जवळ असावंसं वाटतं. नाहींतर मी अगदीं एकटी पडते घरांत, अन् एकटी राहिलें कीं भलभलतं यायला लागतं मनांत. कधीं नव्हे ते पोरीच्या वांट्याला सुखाचे दिवस आले आहेत. ती हंसतेय...गातेय...नटतेय...पण ह्या साऱ्याला एकदम दृष्ट लागेल, एकदम सगळं मृगजळ लोपून जाईल...अशी भीति वाटायला लागते एकटी असलें कीं.

**माधव** : उगाच भलतंच मनांत आणतांय तुम्ही!

**आई** : कोण जाणे कां तें.. वेड्या मायेपोटीं असेल...पण खरंच माझं मन...

**नलू** : आईचं आपलं कांहींतरीच! अग लव्ह मॅरेज म्हणजे जुन्या लग्नासारखं का आहे, कीं आपलं आज ठरलं न् परवां अक्षतादेखील पडल्या!...त्यांचं त्यांनीं लग्न ठरवलंय. आतां सगळंच त्यांच्या मनासारखं नको कां करायला?

**माधव** : चांगला शिकलेला, घरंदाज, श्रीमंत जांवई मिळणार आहे!

**नलू** : हौस तरी किती आहे त्याला! रोज फिरायला, नाहींतर सिनेमाला घेऊन जातोय तिला! हें घेऊन दे...तें दे...

**आई** : तें खरं ग. त्याचा का आनंद मला नाहीं? *(माधवला)*...पण आतां तुम्हीच सांगा, लग्न ठरल्यावर एकदां तरी घरीं यायला हवं होतं कीं नाहीं त्यानं?

**नलू** : कशाला? तुझ्याशीं गप्पा मारायला कीं माझ्याशीं? त्याला जें माणूस हवं तें घरीं न येतांही भेटतंय ना...

**आई** : तरी पण आपली रीत म्हणून. 'मामी, मी तुमच्या मुलीशीं लग्न करतांय्—आम्हांला आशीर्वाद द्या'—एवढं सांगायला तरी?

**माधव** : तुमचे आशीर्वाद मागायला कशाला हवेत?

**आई** : बरं, मला एक नाहीं. पण स्वतःचे आईवडील, भावंडं यांना तरी त्यानं

कळवायला नको होतं कां?...त्यांच्यापैकीं कुणी आलं तर नाहींच, पण कुणाचं बोटभर पत्रसुद्धां नाहीं.

**नलू :** कशाला? तुमची मुलगी आम्हांला कसही करून द्या म्हणून मागणी करायला?...ते लोक श्रीमंत आहेत आई! विसूभाऊनं परस्पर लग्न ठरवलं आहे हें विसरतेस तूं!

**माधव :** कदाचित् त्या माणसांचा विरोधही व्हायचा!

**नलू :** त्यांनीं पसंतसुद्धां करून ठेवलेली असेल मुलगी एखादी, त्यांना हवी तशी...सतरा वर्षांची, गोरीगोमटी, हुंडा घेऊन येणारी!

**माधव :** कांहीं अशक्य नाहीं...पण विसूभाऊ खंबीर आहेत. घरचा विरोध झाला तरी मला नाहीं वाटत ते मागें पाऊल घेतील असं.

**नलू :** निदान घेऊं नये...

**आई :** एकदां सगळं नीट पार पडलं म्हणजे...

**माधव :** त्याची नका काळजी करूं तुम्ही!

**आई :** साखर पडो तुमच्या तोंडांत.

**माधव :** पडलीच कीं लग्नांत!...हें पहा आई, आपण काळजी करून कांहीं होत नसतं!

**नलू :** आणि आहेच काय मुळीं काळजी करण्यासारखं?

**माधव :** आतां ताराबाईचं लग्न झालं न् बाळला नोकरी लागली कीं तुम्ही तुमच्या लेकीजवळच येऊन रहा!

**नलू :** *(कौतुकानं)* पाह्यलंस आई!

**माधव :** बाळच्या नोकरीसाठीं मीही करतोंय् खटपट थोडी!

**आई :** आतां आमचे झालांत ना तुम्ही?...आमच्या चिंता......काळज्या सगळ्या तुमच्याच, त्या काय सुटणार आहेत!

**माधव :** त्यांत काळजी करण्यासारखं काय आहे? नोकरी मिळायची हें ठरलेलंच असतं...बायको तशी नोकरीही जन्माआधींच ठरलेली असते म्हणे! कुणाला लौकर तर कुणाला उशीरां ती सांपडते एवढंच!

**आई :** तें खरंच आहे हो...पण एकदां सगळं लागीं लागेपर्यंत मन का स्वस्थ बसतंय्? *(नलूला)* किती वाजले ग ?

**नलू :** साडेसात वाजले वाटतं.

**आई :** पहा, अजून ही घरीं आली नाहीं. एकदां जी सकाळीं दहाला बाहेर पडलीय ती अजून परत आली नाहीं !...असं कधीं केलं नव्हतं तिनं...अशी कधींच वागली नव्हती ती—मनाला येईल तसं...आतां सारं नवीनच करते आहे एकेक...असं झालं म्हणजे...*(चाहूल लागते)* आलीच वाटतं...

*(तारा येते.)*

**नलू :** झालं समाधान?

*(तारा थकली भागलेली, विमनस्क, उसवल्यासारखी दिसते.)*

**आई :** आलीस! असा उशीर केलास कीं काळजीच वाटायला लागते बघ मला !

**तारा :** *(त्रासलेलीच)* काळजी कसली त्यांत ?

**नलू :** त्यांतून ती एकटीच कुठें गेली असती तर—

**तारा :** *(बदलून)* हो, मी एकटीच कुठें गेलें असतें अन् तूं काळजी केली असतीस तर बरोबर म्हटलं असतं. पण विश्वनाथ माझ्याबरोबर असतांना...

**आई :** तरी पण...अग, लग्न व्हायच्या आधींच असं दोघांनीं फार हिंडूं नये. लोकांच्या डोळ्यांवर येतं तें. काय वाटेल तें बोलतात मग.

**नलू :** इश्श ! आईचं आपलं कांहींतरीच !

**तारा :** नाहीं तर काय?...अग, आज दुकानांत गेलों होतों आम्ही.

**आई :** म्हणून इतका उशीर झाला होय ?

**तारा :** हो ना. *(नलूला)* बघ तरी काय आणलंय तें !

**नलू :** आहे बुवा, चैन आहे न् काय ? परवां ते इअरिंग्ज झाले, काल सेंट नि आज काय आणलंय आणखी ?

**तारा :** आज ना—तूंच ओळख !

**नलू :** *(नज़रेनें शोधत)* कुठं आहे?

**तारा** : पर्समध्यें !

**नलू** : पर्समध्यें काय आहे बाई ! घड्याळ कीं काय ?

**तारा** : सगळ्यांनीं घड्याळंच द्यावींत असा नियम आहे कीं काय ?

**नलू** : मग आहे तरी काय ?

**तारा** : नाहीं ओळखत ? हें बघ...*(पर्समधून सुंदर रेशमी साडी काढून दाखवते. नलू थक्क होते.)* बघ, हात लावून तर बघ !

**नलू** : *(हळूच हात फिरवते.)* अगदीं मोराचं पीस हातावरनं फिरवल्यासारखं वाटतंय् ग ! रंगसुद्धां छान आहे.

**तारा** : हो, मला निळा रंग फार आवडतो.

**नलू** : मला वाटलं, विसूभाऊंची निवड !

**तारा** : *(सुधारून घेत)* नाहीं तरी त्यालासुद्धां निळा रंग फार आवडतोच ! आज तर साडी घेतल्यापासनं सारखं गुणगुणत होता "तूं निळ्या नभाची राणी ग !"...

**नलू** : नुसतीच निळ्या नभाची, कीं आणखीसुद्धां कुणाची ग ?

**तारा** : हो हो, आणखीसुद्धां कुणाची बरं ! *(आईकडे वळत)* काय किंमत असेल साडीची, सांग बघूं आई !

**आई** : अग, मला काय कळणार असल्या पातळांच्या किंमतींतलं ? आम्हीं जन्मांत कधीं घेतलीं आहेत का असलीं पातळं ?

**तारा** : तरी पण...अंदाज तरी ?

**आई** : *(फार मोठा अंदाज करून)* पडले असतील तीस...पस्तीस ?

**तारा** : बस्स ? एवढाच तुझा अंदाज ? बायकोला परितसाची फडतूस साडी घ्यायला तो काय क्लार्क आहे कीं मास्तर ?...नलू, तूं सांग बघूं ?

**नलू** : प...न्ना...स ! बरोबर ?

**तारा** : छट्, हरलांत दोघी. अगदीं साफ हरलांत ! दोघींच्या अंदाजाची बेरीज करा...पुरते पंच्याऐंशीं मोजलेत साडीला ! सेल्सटॅक्स वेगळाच आणखी !

**आई** : *(कौतुकानें)* काय ग हे पैसे खर्च करणं !

**तारा :** *(जोरानें)* मग ? *(वरमत)* होय ना. असाच खर्चिक आहे वेडा तो ! एकदां दुकानांत शिरला कीं बायकोसाठीं काय घेऊं न् काय नको असं होतं त्याला अगदीं...पागल बनतो पागल !

*(साडी उलगडून भडक लडिवाळपणें अंगावर धरते.)*

**नलू :** *(हेव्यानें)* छान वाटत असेल नाहीं ग अशी मस्त साडी नेसायला !

**आई :** *(हळवी होऊन)* हें सगळं कौतुक पहायला ज्यांचे ते असायला हवे होते ग !

**तारा :** *(दचकून)* कोण ?

**आई :** तुझे वडील हो.

**नलू :** मी तर म्हणतें, हिनं ही नवी साडी नेसल्यावर पहायला विसूभाऊ हवे होते...(ताराला चिडवीत) तुलाही वाटतंय कीं नाहीं तसं ? अगदीं मनांतनं !

**तारा :** अच्चं कां ? बरंच कळतंय कीं बाईसाहेब आपल्याला !

**आई :** *(हळवेपणानेंच)* त्यांना फार कौतुक होतं बघ तुझं...पण त्यांच्या मनासारखं कधीं त्यांना करायला मिळालं नाहीं...दोन मुलींवर तिसरी मुलगीच झाली म्हणून मी खट्टू झालें, तर मला म्हणाले कीं, हाच आपला मुलगा ! अन् होते तोंवर मुलासारखंच वागवलं त्यांनीं तुला ! किती लाड केले ! कुठें गेले न् जरा कांहीं नवीन दिसलं कीं आले घेऊन !...आणि शेवटींसुद्धां तुझीच आठवण काढीत होते सारखी. ताराचं कांहींच नीट करूं शकलों नाहीं, म्हणत होते. तुझ्यांतच जीव अडकला होता त्यांचा...त्यांच्या हातनं नाहीं झालं, पण कुणी तरी तुझं इतकं कौतुक करतं आहे हें पहायला ते असते तर फार आनंद झाला असता त्यांना. फार समाधान वाटलं असतं...पण नशिबांत नव्हतं त्यांच्या...नशिबांतच नव्हतं.. आधींच गेले ते.

*(डोळ्यांना पदर लावून निघून जाते.)*

**तारा :** *(हिच्या गांवीं हें कांहींच नाहीं. स्वतःच्या श्रीमंत प्रियकरानें प्रेमभरानें दिलेल्या साडीच्या कौतुकाचें नाटक करण्यांत, आपल्याला मिळालेल्या ऐश्वर्याचें, प्रेमाचें नलूपुढें प्रदर्शन करण्यांतच ती गुंग आहे.)* परवां फिरायला गेलों होतों आम्ही, तर मला म्हणाला कसा, कीं एखाद्या चांदण्या

रात्रीं, नदीकाठीं एकटं फिरायला जायचं. हो, एकटं म्हणजे फक्त आम्ही दोघांनीं धाकटी बहीण, धाकटे भाऊ not allowed ! म्हणाला, कीं चांदण्याचं सरबत पीत, रातराणीचं अत्तर हुंगीत, शेजारीं तूं असतांना मनमुराद हिंडायचंय मला, तारा ! कधीं नव्हे तें नशीब उघडलंय म्हणाला !...आणखी काय विचारलंन्, माहीत आहे ?*(लाजण्याचा अभिनय करून)*...इश्श !...मला म्हणाला—अगदीं माझ्या कानाशीं तोंड आणून म्हणाला—Have you ever kissed in the moonlight ? Have you ? (Hysterical हंसते.)

**नलू :** *(हेव्यानें)* बराच रसिक आहे कीं ग !

**तारा :** तुम्हांला असं कधीं फिरायला जायला नाहीं मिळालं, नाहीं ?

**नलू :** *(समाधान मानून घेत)* गेलों होतों आम्ही एकदां !

**तारा :** कधीं तें ? आणि कोणकोण ?

**नलू :** कोणकोण नाहीं, आम्ही दोघंच ! मला तर बाई इतकी लाज वाटत होती ! सारखं वाटत होतं कीं अशीं आम्ही दोघंच जातांना कुणी ओळखीचं समोर यावं. एखादी मैत्रीण नाहीं—तर शाळेंतले सर !...मेलेंच असतें बघ मी लाजून असं कांहीं झालं असतं तर !

**तारा :** लाजायचंय काय ग त्यांत ?

**नलू :** पण सुदैवानं तसलं कांहीं झालं नाहीं. म्हणजे ओळखीचं कुणी भेटलं नाहीं. पण—अखेर व्हायचं तें झालंच नि मी लाजून अश्शी चूर झालें म्हणतेस !

**तारा :** काय झालं ग असं ?

**नलू :** अग, अशीं आम्ही दोघं जात होतों तर वाटेंत वेणीवाला दिसला. यांनीं मला विचारलं, 'वेणी पाहिजे का', तर मी 'नको' म्हटलं बरं का चांगलं ! पण तो वेणीवाला कसला ऐकतोय ? 'मोगऱ्याची वेणी न् खूप करा राणी' म्हणून ओरडत लागला आमच्या पाठीमागें ! आणि यांनींही घेतली कीं वेणी. न् गांवाबाहेर सरळ माझ्या डोक्यांत...*(भयंकर लाजते.)*

**तारा :** *(हंसते)* बरेच आहेत कीं ! आणखी काय काय म्हणत होते ? म्हणजे आम्हांला सांगण्यासारखं असेल तेवढंच सांगा !

**नलू :** इश्श, न सांगण्यासारखं काय बोलायचं असतं ग ?

**तारा :** कळेल हळू हळू !

**नलू :** म्हणत होते कीं मला अवघा एकशें-पंधरा रुपये पगार मिळतो...

**तारा :** पुरे झाला कीं दोघांना.

**नलू :** दोघांना पुरे झाला ग ! पण सासूबाई नि वन्सं पण यायच्यात आमच्या-चकडे !

**तारा :** त्या कशाला ?

**नलू :** कां ? त्यांचा कांहींच का हक्क नाहीं यांच्यावर ? त्या दोघी फार प्रेमळ आहेत. वन्सं तशा थोड्या रागीट आहेत—पण लहान वयांत तशाच असतात मुली ! हे तर सांगत होते कीं सासूबाईच्या खास पसंतीनं माझ्याशीं लग्न ठरवलं त्यांनीं. फार आवडले म्हणे मी त्यांना. अन् वन्सं तर माझ्याच बरोबरीच्या आहेत. मी सासरीं रहायला गेल्यावर भरकन मैत्री जुळेल आमची ! त्या दोघींवर यांचाही फार जीव आहे. इतकी त्या मंडळींची एकमेकांवर माया असतांना आपण कशाला फूट पाडायची अन् आपल्याच माणसाचं मन दुखवायचं ? त्यांना ज्यांत सुख तेंच मलाही सुखाचं, नाहीं कां ?

**तारा :** ऊं ऽ हूं ! आपलं नाहीं बाबा असं ! आपण लग्नाच्या वेळेला नुसती सही ठोकणार न् छू पळणार हनीमूनला !

**नलू :** कुठं तें ?

**तारा :** कुठंही ! अग, उटी—उटकमंड, काश्मीर !...खूप भटकायचं, फोटो काढायचे, खायचं, प्यायचं, चैन करायची, बस्स !

**नलू :** अग बाई, सगळे बेत आधींच ठरलेले दिसताहेत तुमचे !

**तारा :** *(रुबाबानें)* मग ?

**नलू :** या साऱ्यांतनं तुमचे पाय जमिनीला लागून बिऱ्हाड कधीं थाटणार तुम्ही ?

**तारा :** बिऱ्हाड ? हनीमून संपल्याबरोबर लगेच ! एक बंगलासुद्धां बघून ठेवलाय, छोटासा—छानसा ! अगदीं फेंट क्रीम कलर...त्याला रुंद हिरव्या खिडक्या... अंगणांत छोटीशी बाग—गुलाब, मोगरा, जाई, डेलिया, कॉसमॉस—आणि ग्लॅडिओलाय्...गौर थाटल्यासारखा दिसतो बंगला...

**नलू :** सबंध बंगला कुणासाठीं ग?

**तारा :** कुणासाठीं म्हणजे? माझ्यासाठीं, आमच्यासाठीं! दोघांनीं रहायचं म्हणजे सबंध बंगला नको का? नोकर आहेत, चाकर आहेत, आचारी, शोफर...सारे तिथंच रहायचे कीं!

**नलू :** होय ना!

**तारा :** नांवही ठेवलंय् बंगल्याचं त्यानं! "तारानाथ!"

**नलू :** छान आहे नांव! काव्यमय. पुन्हां तुम्हां दोघांचींही नांवं आहेत त्यांत!

**तारा :** आणि मुख्य जर काय होणार असेल तर लग्न झाल्याच्या दिवसापासनं नोकरी बंद! तो दहा ते सहाचा तुरुंगवास, फायली, आकडेमोडी, डोकेफोडी, सारं एकदम बंद! म्हणतो कसा—'माझी बायको म्हणजे कारकुनाची बायको नाहीं खर्डेघाश्या करायला!'

**नलू :** नोकरी सोडायलाच हवीस नाहींतरी तूं लग्न केल्यावर! एक संसार म्हणजे थोडं का काम असतं?

**तारा :** छे छे, काम मुळींच करायचं नाहीं बायकोनं! ताराराणी ना मी? नोकरचाकर तर ठेवायचेच वरकामाला, पण स्वैपाकीसुद्धां...नुसत्या स्वैपाकाला नव्हे, तर ताराराणी मागतील तेव्हां त्यांच्यासमोर काय वाटेल तें खायला ठेवणारा! एखादा कप चहासुद्धां बायकोनं करायचा नाहीं, मग इतर कामाची गोष्टच सोड! बस्, आराम करायचा, चैन करायची, पिक्चर्स पहायचीं, स्वतःच्या गाडींतून रुबाबांत हिंडायचं!......बस्स, संसार म्हणजे गुलाबाच्या फुलांचा गालिचा!... आणि सांगूं का...एकेक वेळां इतका हळुवार होतो तो...इतका हळुवार होतो...कीं गुलाबाच्या पाकळयासुद्धां बोचतील कीं काय ताराराणीच्या पावलांना, अशी भीति वाटते ग त्याला!

**नलू :** खरी भाग्यवान् तूं!

**तारा :** आणि पहिल्या बेबीचं *(नलू दचकते.)* नांव काय ठेवणार आम्ही, माहीत आहे?...*(नांव तोंडांत घोळवीत)* मीनल...मीनल!...कित्ती गोड आहे नाहीं नांव? पिंगट कुरळ्या केसांची, घाऱ्या लुकलुकत्या डोळ्यांची, लालचुटुक ओठांची

गोरीपान परीच उभी रहाते डोळ्यांपुढें 'मीनल' म्हटलं कीं!...मुलांची फार हौस मला...न् त्यालासुद्धां! पांच तरी हवींत म्हणे!

**नलू :** पांच?

**तारा :** *(एकदम भित्री होत)* पण सांगूं कां? मूल म्हटलं कीं मला फार भीति वाटते ग! मूल म्हणजे मला एकच आठवतं, साठीणबाईच्या मुलाचं प्रेत! ...तें आठवतं नि शहारे उठतात अंगावर, घसा कोरडा पडतो, हातापायांतली सारी शक्ति शोषून घेतली जातेय्—पायाखालची जमीनच कुणी काढून घेतं आहेसं वाटतं!...अन् असं वाटतं कीं कशावर म्हणून माणसानं जीव लावून ठेवूं नये...अगदीं कश्शावर!...लागोपाठ आठ मुलं गेल्यावर जगलेला मुलगा होता तो त्यांचा...किती जपायच्या त्या त्याला...आपल्या जिवाच्या चंदनाच्या पेटींत ठेवलं होतं त्यांनीं त्याला! कुणी पहात नाहींसं बघून त्या त्याला जवळ घ्यायच्या, उराशीं घट्ट धरायच्या, मटामट मुके घ्यायच्या, अन् आपलीच—आपलीच दृष्ट लागूं नये म्हणून गालबोट लावायच्या!...आणि पुरते सहा महिनेही व्हायच्या आंत तो मुलगा गेला...थंड झाला. जो जिवंत गोंडस बछडा होता तो एक मांसाचा निर्जीव गोळा झाला! काय उरलं शेवटीं हातांत? काय उरलं? काळंभोर दुःख...जन्माची निराशा! ...माणसं त्या प्रेताला न्यायला आलीं...पण त्या त्याला सोडेनात, घट्ट धरून बसल्या होत्या...'न्यायचं नाहीं, न्यायचं नाहीं' म्हणून आक्रोश करीत होत्या...'यालाही नेलंत तर मला कोण? मी कुणाकडे पाहूं' म्हणून विचारत होत्या!...शेवटीं कुणी तरी आलं न् त्याला हातांतनं हिसकावून घेऊन गेलं! घेऊन गेलं...होत्याचं नव्हतं झालं नलू! एक स्वप्न उमललं, हांसलं. एका भाबड्या, सुख माहीत झालेल्या जिवाला आशा लावली त्यानं...पण शेवटीं एका बर्फाच्या हातानं त्याला खुडून नेलं...पुन्हां परत न द्यायला खुडून नेलं...आतां त्या भाबड्या जिवाचं काय ग व्हायचं?

*(हमसाहमशीं रडूं लागते.)*

**नलू :** ताई, ए...अग असं काय करतेस? असं काय? केव्हांच होऊन गेलेल्या गोष्टी या...त्यांचं आत्तां काय?...उगी, उगी म्हणतें ना!

*(बाळ येतो. ताराला रडतांना बघतो. एक प्रकारचें बरें वाटतें त्याला.)*

**बाळ :** *(संथपणें)* रडूं दे, रडूं दे तिला! म्हणजे तरी बरं वाटेल तिला. रडायलाच हवं आहे तिनं!

**नलू :** अरे पण बाळ, पांचसात वर्षांपूर्वीच्या गोष्टी या—

**बाळ :** *(संथपणेंच)* कुठल्या?

**नलू :** साठीणबाईंचा मुलगा गेला, त्या वेड लागेपर्यंत रडल्या, या! मला तर नवलच वाटतंय! इतका वेळ चांगली हंसत होती, बोलत होती, कितीतरी गमती सांगत होती ही, अन् एकदम एकाएकीं अशी जीव तोडून रडायला लागली!

**बाळ :** रडायलाच हवं आहे तिनं! किती दिवस न रडतां रहाणार आहे?

**नलू :** असं काय? आतां हिला रडण्यासारखं काय झालंय्? चांगलं लग्न ठरलंय्! होशी नवरा मिळालाय्...

**बाळ :** *(शान्तपणें)* अजून सांगितलं नाहीं हिनं तुम्हांला?

**नलू :** काय तें?

*(तारा या वेळीं चमकून त्याच्याकडे पहाते.)*

**बाळ :** विश्वनाथचं लग्न ठरलंय्...ताईशीं नव्हे...दुसऱ्याच मुलीशीं! हिचं लग्न मोडलंय्!

**नलू :** *(विस्मयानें)* काय?

**तारा :** *(त्वेषानें)* खोटं आहे तो काय म्हणतोय् तें!

**बाळ :** काय खोटं आहे? विश्वनाथचं लग्न आजपासून पंधरा दिवसांनीं व्हायचं ठरलं आहे हें खोटं आहे? त्याला पंधरा हजार हुंडा मिळायचा आहे हें खोटं आहे?...नेमस्त वधू, जादा न शिकलेली, सतरा-अठरा वर्षांची, कोंवळी काकडी...

**तारा :** *(त्वेषानें ओरडून)* बाऽऽळ!

**नलू :** *(संतापानेंच)* बाळ, काय बडबडतो आहेस त्याची शुद्ध आहे का तुला?

**बाळ :** *(तरीही शांतपणें)* आतां जर न बोललों तरच शुद्ध जाणार आहे माझी!...ही बोलत नाहीं, अजून मुखवटा फुटत नाहीं तिचा—ढोंगी, फसवी—

**नलू :** *(त्वेष)* फसवी? कशावरनं?

**बाळ :** विचार तिलाच! बघूं तोंड उघडून खरं सांगतेय का आतां तरी!

**नलू :** *(त्याला खोटें पाडीत)* आज सहा महिने तीं दोघं फिरायला जाताहेत —राजरोसपणें, कुणालाही न फसवतां! लग्न झाल्यावर कुठला बंगला घ्यायचा, कुठला स्वयंपाकी ठेवायचा इथपर्यंत बेत ठरलेत त्यांचे! माणूस इथपर्यंत ढोंग करील? करूं शकेल? परवां ते इअरिंग्ज घेऊन दिले त्यानं,· पर्स, अत्तराची बाटली...उगीच कुणी कुणावर असा प्रेझेंट्सचा वर्षाव करील?

**तारा :** *(तोल सांवरून)* बघ ना, गेल्या महिन्याभरांत तर एक दिवस मला भेटल्याखेरीज राहूं शकलेला नाहीं तो—विश्वनाथ. तुझं लग्न झाल्यावरच आम्ही लग्न करायचं म्हटलं, तर कोण गयावया केल्या त्यानं! किती वाईट वाटलं त्याला! रागावला, रुसला, त्रागा केला......पण शेवटीं झाला कसाबसा कबूल!...... बिचारा!......माझ्या शब्दाबाहेर जाणं नाहींच व्हायचं त्याच्याच्यानं...

**बाळ :** *(रोखून पहात, कठोरपणें)* ताई...

**तारा :** *(बोलतेच. सारेंच बनवून)* गेल्या पंधरा दिवसांत तीन सिनेमे पाहिले आम्हीं—बॉक्सच्या तिकिटांत!......परवांच तर गेलों होतों आम्ही.

**बाळ :** *(चिडीनें)* आम्ही म्हणूं नको.

**तारा :** *(जणूं ऐकलेंच नाहीं.)* अन् तिथनं बाहेर पडल्यावर मला म्हणतो कसा, चांदण्याची शराब पीत...रातराणीच अत्तर हुंगीत...आणिसुद्धां कांहीं कांहीं म्हणाला...म्हणाला कीं Have you ever kissed in the moonlight...Have you? *(hystericl भेसूर हसते.)*

**बाळ :** *(जोरानें)* एकजात सारं खोटं आहे हें!...एकटी हिंडते आहेस तूं गेल्या महिनाभर...एकटी रस्ते तुडवते आहेस...कुणी कुत्रंसुद्धां नसतं तुझ्याबरोबर...भिरींभिरीं हिंडावं, खूप उशीर करावा, थकूनभागून गेल्यावर लळत लोंबत, पावलं खुरडत घरीं यावं...अन् घरीं आल्यावर चंद्रबळ आणून हसावं, तोंड वासून सांगावं कीं मी त्याच्याबरोबर, त्या नीच माणसाबरोबर फिरायला गेलें होतें, खरेदीला गेलें होतें, आम्ही अमकं केलं न् तमकं केलं...

**तारा :** *(त्याला नाउमेद करण्याचा प्रयत्न)* उगीच कांहीं तरी चित्रं रंगवूं नकोस...

**बाळ :** आजसुद्धां पाहिली मीं तुला. त्या पारशानं मोटार झटक्यानं बाजूला

काढली नसती तर चेंगरून मरत होतीस तूं आज!...त्या भल्यामोठ्या रस्त्यावरनं अगदीं एकटी, एकटी चालली होतीस तूं...पाय ओढीत...

**तारा :** *(असह्य होऊन)* खोटं बोलतोय् हा! बनवून सांगतोय् सारं! कुठं झोंकून बिकून आला आहेस कीं काय?

**नलू :** *(संतापानें)* आज एकटीला पाहिलंस हिला तूं? अरे, खोटं खोटं तरी किती सांगशील?...ही बघ, चांगले डोळे फाडून बघ...आज, आज संध्याकाळीं विसूभाऊनं ही साडी घेतली हिला. *(साडी त्याच्यासमोर धरीत)* पक्के पंच्याऐशीं रुपये मोजलेत...या एका साडीच्या किंमतीइतका पैसा उभ्या जन्मांत तरी मिळवतां आलाय् का तुला?

**बाळ :** साडी सुरेख आहे···ताईची पसंती इतकी सुधारलेली मला माहीत नव्हती!

**नलू :** विसूभाऊची पसंती आहे ती!

**बाळ :** *(ठांसून)* ताराताईची पसंती आहे ती! आज संध्याकाळींच आपल्या नेमस्त वधूला घेऊन 'निरॉस' मध्यें शिरतांना पाहिलं मी विश्वनाथला.

**तारा :** *(अजून बाळला खोडूं पाहण्याचा प्रयत्न)* थापा...

**बाळ :** *(ठामपणानें)* तिथं जाऊन भेटून आलों मी त्याला!

**तारा :** *(असावधपणें)* काय म्हणाला तो?

**बाळ :** *(तिला शब्दांत पकडीत)* कोण?

**तारा :** विश्वनाथ!

**बाळ :** कां, आज तुझ्याबरोबर होता ना तो?

**तारा :** तुलाही भेटला ना तो?

**बाळ :** भेटतो कसला? मागनं जाऊन कॉलर पकडून भेटायलाच लावलं त्याला मीं!

**नलू :** काय रासवटासारखं वागतोस रे!

**बाळ :** नरडंच फोडणार होतों त्याचं! पण ती बया होती ना तिथं! एका पोरीला नादाला लावून दुसरीशीं मजा मारतो...

**नलू :** बाळ्या, तोंड आवर रे !

**बाळ :** विचारलं त्याला मीं, मध्येंच असं शेपूट कां गाळलंस म्हणून !...बदमाष, कुठं न् काय करायला लागला ! हरामखोराला स्पष्टच विचारलं, माझ्या बहिणीला कां नादीं लावलंस म्हणून !

**नलू :** तोच लागला होता तिच्या नादीं !

**बाळ :** अन् तुझी बहीण मोठी जोगीणच कीं नाहीं !...त्याचं तरी काय चुकलं म्हणा !...जो तो आपल्या फायद्याचं बघणार !...आजवर शंभर पोरींबरोबर वावरला असेल तो— शेवटीं लग्न एकीशींच करायचं ना ! *(तारावर चिडून)* ही...ही हुरळली त्यानं जरा खूण करतांच !

**नलू :** तुला नाहीं कळायचं तें कसं होतं तें !

**बाळ :** पाह्यलं आज संध्याकाळीं प्रत्यक्ष...खुषींत दिसत होता तो मोठा...अन् तीही ! नेहमींच त्याच्याबरोबर फिरायची संवय असल्यासारखी चालत होती ती ! त्याच्या हातांत आपला गोरा गोंडस हात अडकवून, मोठ्या लाडांत येऊन, माना वेळावून कांहीं तरी बोलत होती...अन् तोही जगावर खूष होऊन सारं ऐकत होता...तिला लुब्रेपणानं स्पर्श करीत होता.

**तारा :** *(तणतणत)* बोल तूं, काय हवं तें बोल. पण तूं बोललास म्हणून कुणाचा त्यावर विश्वास बसेलसं मानूं नकोस !

**बाळ :** *(बोलतोच आहे)* वीत वीत जरीचे कांठ असलेली, अबोली रंगाची साडी नेसली होती ती...तिच्या पायांतल्या चपलांच्या किंमतींतच वर्षभराच्या साड्या आल्या असत्या तुमच्या...उंच, गोरी, नाजुक, कोंवळीं, नखरेल, श्रीमंत !...एकूण मोठी फक्कड मुलगी पटकावलीन् विश्वनाथनं !...'ही तरी नक्की का ?' विचारलं, तर पत्रिकाच दाखवलीन् त्यानं···

**तारा :** *(रडवेला पण तीव्र सूर)* झालं बोलून तुझं ? संपलं ? आतां मी बोलतें जरा !...माझं बरं झालेलं तुला बघवत नाहीं. माझं लग्न झालं तर तुझा ऐदीपणा कसा चालणार; दोन वेळां गिळायला न् चोवीस तास सिगरेटी फुंकायला कशा मिळणार, याची काळजी तुला ! म्हणून माझं ठरलेलं लग्न मोडायचंय् तुला. माझ्या सुखांत बिब्बा घालून आपली सोय पहायचीय् ! नीच,

कृतघ्न आहेस तूं...*(त्याच्या वर्मींच घाव घालीत)* आत्तांपर्यंत तुझं एवढं मीं केलं त्याची तरी जाणीव ठेवायचीस? तोंड वेंगाडलंस तेव्हां तेव्हां पैसे ओतले तुझ्यापुढें मीं. वर्षेन् वर्षं बेकार राहिलास तरी भर केली तुझी मीं. त्याचे उपकार हे असे फेडतो आहेस?...सापासारखा उलटतो आहेस बहिणीच्या अंगावर, तिच्याकडे तुकडे मोडून?

**बाळ :** *(हिंस्रपणें)* Shut up! फार ऐकून घेतलं तुझं मीं. तुझ्या पैशावर चाललेलं घर शक्य तेवढ्या लौकर सोडून जाणार आहेंच मी. तुझ्या कर्तेपणाचा फार धूर सांठला आहे त्यांत. गुदमरतों आहे मी. पण जायच्या आधीं तुझा तकलाबी, ढोंगी मुखवटा फोडणार आहें.

**तारा :** *(उपहासानें हंसून)* मुखवटा घालायची मला काय जरूर? आपल्या माणसाची, त्याच्या प्रेमाची खात्री असली म्हणजे...

**बाळ :** कुणाच्या प्रेमाची खात्री? विश्वनाथच्या? त्या श्रीमंत बापाच्या उल्लू पोराच्या? त्यांच्या प्रेमाची रीत वेगळी असते फार! तुला कळलीच असेल ती. त्याची लग्नपत्रिकाही मिळाली असेल तुला!

**तारा :** *(ओरडून)* बाळ...चालता हो माझ्या नजरेपुढून.

**बाळ :** *(एकदम कांहींतरी डोक्यांत येऊन तिथेंच उघडया असलेल्या तिच्या पर्समध्यें हात घालतो.)*

**तारा :** *(त्याच्याकडे धावत)* बाळ, माझी पर्स आण इकडे—हात लावूं नकोस तिला...आण म्हणतें ना!

**बाळ :** घे...हे तुझ्या माणसाच्या प्रेमाचे पुरावे!...हीं सिनेमाचीं दोन तिकिटं. काढलेलीं, पण न वापरलेलीं.

**तारा :** *(आतां विनवणीच्या सुरांत)* बाळ!

**बाळ :** हें विश्वनाथाकडून प्रेझेंट मिळालेल्या इअरिंग्जचं बिल—Diamond Jewellers, Received with thanks from Miss Sane Rs. 10, as 12. *(एक एक कागद वाचून बोळे करून खालीं टाकतो.)* हें त्या सेंटच्या बाटलीचं बिल—Mischief! आणि हें...'आनंद-वस्त्र-निकेतन'चं!—तारीख आठ जुलै

—म्हणजे आजचंच! आज संध्याकाळचं! 'कुमारी ताराबाई साने. चाळीस रुपये, बारा आणे, सहा पै. रोख मिळाले'— पंच्याऐशीं नव्हे!

**तारा :** *(शेवटचा प्रयत्न करीत)* हो. मग काय झालं, म्हणतें मी? बिलं कुणाच्याही नांवावर केलीं तरी एकच, असं म्हणाला होता तो...

**बाळ :** *(एक गुलाबी कागद उघडीत)* आणि ही प्रेमाची लग्नपत्रिका! "आमचे येथें श्रीकृपेंकरून वर विश्वनाथ गोखले, वधू चि. सौ. कां. जयमाला शेवडे...'

*(सबंध पत्रिका धडाधडा वाचतो. तिच्या अंगावर पत्रिका फेकतो. ती पत्रिकेकडे पाहातही नाहीं! शक्ति खचून गेल्यासारखी खुर्चीवर बसलेली. दगडासारखी स्तब्ध. पत्रिका तिच्या पायाशीं पडते. पडलेलीच राहाते. नलू ताराजवळ जाते—सांत्वनासाठीं तिच्या खांद्यावर हात ठेवते. तारा जोरानें तिचा हात दूर झटकते. आई येऊन थबकून उभी. आंतल्या दाराशीं. बाळ हातांतली सिगारेट नीट विझवून थोटूक बाजूला फेकून देतो आणि सावकाश निघून जातो. मुळींच मागें न पाहतां.)*

पडदा.

# अंक तिसरा

*दुसऱ्या अंकानंतर दोनएक वर्षे लोटलेलीं. वेळ तिन्हीसांजेची. एका बंगल्यांतल्या दोन खोल्यांच्या ब्लॉकमधली बसायची खोली. बंगल्यांतल्या रहाणीला शोभेलसें सेकंडहँड फर्निचर व इतर सामान या खोलींत आहे. पूर्वीच्या कर्त्या माणसाच्या फोटोऐवजीं दोनचार लोकप्रिय, उत्तान चित्रें भिंतींवर आहेत. एक फोनोही हवा.*

*या सगळ्यांत अंग चोरून एक दत्ताची तसबीर लटकते आहे. तिच्यापुढें आई दिवा लावते आहे. एकाग्रतेनें, भक्तिभावानं. नलू दबकत येते. नऊवारी पातळ. सासुरवाशीण दिसावी. क्षणभर ती थबकते. आईचें लक्ष जात नाहींसें पाहून कांपरी हांक मारते.*

**आई :** *(तंद्रींतून दचकून)* कोण, नलू? इथं कशी तूं या वेळेला? तिन्हीसांजेचं सासूबाईनीं पाठवलं बरं तुला — या स्थितींत!

**नलू :** सासूबाईना चुकवूनच आलेंय मी. आज किती तरी दिवस यायचं यायचं म्हणतेंय—पण—*(एकदम आवेगानें)* आई! सासूबाईनीं ताकीद दिलीय मला कीं...कीं मी माहेरीं ... तुझ्याकडे कधींच यायचं नाहीं ... डोहाळजेवणसुद्धां इथं व्हायचं नाहीं माझं...!

**आई :** *(किंचित् रागानें)* तें कां?

**नलू :** *(रागानेंच)* सासूबाई म्हणाल्या कीं ज्या घरांत ताराताईसारखी...आई, सासूबाईनीं ताईबद्दल वाटेल तें ऐकलंय्, काय वाट्टेल तें!...त्या सांगत होत्या... त्यांना कळलंय् कीं ती रोज...रोज वेगवेगळ्या पुरुषाबरोबर हिंडते, फिरते... नुसतीच हिंडत फिरत नाहीं...आणखीसुद्धां कांहीं...! आई, खरं आहे का ग हें? खरं आहे? *(आई 'नाहीं' म्हणेल ही दृढ अपेक्षा.)*

**आई :** *(अखेर संथपणें)* हो. खरं आहे सारं. एक अक्षरही खोटं नाहीं त्यांतलं. एक अक्षरही...नुसतं बाहेरच नाहीं, घरांतसुद्धां तेंच चाललंय्!...बरं झालं तुझ्या सासूबाईनींच तुला सगळं सांगितलं तें. नाहीं तर मी कशी तुला

सांगणार होतें?...उघड्या डोळ्यांनीं सारं पाहावं लागतंय्, तेंच जिवापेक्षां जड झालंय् मला!

**नलू :** छे आई, अजून विश्वास बसत नाहीं माझा! खरंच वाटत नाहीं हें ताईच्या बाबतींत.

**आई :** प्रत्यक्ष पहावं लागत नाहीं तुला···म्हणून...

**नलू :** पण ताई त्यांतली मुलगी नव्हती ग.

**आई :** तशी नव्हती न् कशी होती...आतां त्याची छाननी करून काय व्हायच्चंय् पोरी?...तोल सुटला—सांवरतां सांवरेना तिचा तिला. हातांतनं गेलीय ती आतां...चार माणसांत डोकं वर काढायला तोंड उरलं नाहीं. म्हणून तर ती जागा सोडून इकडे आलों आम्ही. वाड्यांत म्हणजे अगदीं कांहीं छपून रहात नाहीं. बंगल्यांत आपलं बरं असतं...काय वाटेल तें चालो तुमच्या घरांत. कुणी कांहींही विचारणार नाहीं...

**नलू :** पण आई, तूं कसं चालू दिलंस हें? तुला कसं पहावतं हें सारं? कां नाहीं सांवरलंस तिला वेळच्या वेळीं?

**आई :** दूर राहून विचारायला चांगले आहेत प्रश्न हे! उतारावरून सुटलेला दगड नाहीं ग सांवरतां येत कुणाला! तो असाच्च गडगडत, ठेंचाळत खालीं जायचा न् आपण उघड्या डोळ्यांनीं पहात रहायचं...कांहीं न करतां पहात रहायचं! बरं झालं, तुम्ही तरी सुटलांत यांतनं. तुझं लग्न झालं, बाळ नोकरी लागली तिकडे गेला.

**नलू :** तूं तरी कशाला रहाते आहेस या नरकांत?

**आई :** मग काय करूं?

**नलू :** आम्ही कुणीहि तुला नेऊं शकतों आई. बाळला आतां नोकरी लागलीय्—त्याच्याकडे हक्कानं जाऊन रहा. नाहीं तर माझ्याकडे चल. मी सांगेन सासूबाईंना सगळं समजावून...

**आई :** तुम्ही सारीं अशीं अंग झटकून जाऊं शकतां नले. पण मीच तिला सोडून गेलें तर तिच्याकडे पहाणार कोण? आज चार टोळभैरव जमून तिला डोक्यावर घेताहेत, हवी तशी लुटताहेत, पण प्रसंग आला कीं...प्रसंग आला कीं...

**नलू** : आणखी कसला प्रसंग आई?

**आई** : येऊं नये तो......

**नलू** : म्हणजे सासूबाई म्हणत होत्या तें खरंच तर!

**आई** : काय म्हणत होत्या?

**नलू** : आई, कशी विचारूं तुला?...पण त्या म्हणत होत्या, त्यांना कुणीसं सांगितलं म्हणे, कीं ताराताई...ताराताईचं अगदीं होऊं नये तें झालंय्. फसलीय् ती कुठं तरी...खरं आहे हें आई? खरं आहे?...बोल ना! लोक चार तोंडांनीं चार गोष्टी बोलताहेत तरी तूं अशी गप्पच? सांग ना...खरं आहे हें?...खरं आहे?

**आई** : होय! खरं आहे सारं...सारं! लोकांना दिसतं तसं मलाही सारं दिसतंय्! पण आई आहें तिची मी! चाललंय् तें वाईट...अगदीं नामुष्कीचं, गलिच्छ आहे हें दिसतंय्...पण आणखी कांहीं तरी आंत उमजतंय् मला! हें असं कां चालतंय् तें कळतंय् मला! थांबवण्याच्या पलीकडे गेलंय सारं आतां पोरी. पण जें होईल तें सारं पहायला मी असायला पाहिजे इथं ··· मीच असायला पाहिजे...तिला मी न् मला ती. दोघींनीं एकमेकींना जपायचं, एकमेकींचे अबोल कष्ट पहायचे अन् आंतल्या आंत जळायचं, झुरायचं! मी ही अशी, नि तीही...तिच्यापरी तीहि विधवाच नाहीं तर काय?

**नलू** : काय बोलते आहेस आई?

**आई** : खोटं नाहीं हें. मीं खाल्ल्या नसतील इतक्या तुमच्या खस्ता तिनं खाल्ल्या. नोकरी करून तुम्हांला वाढवलं, शिकवलं, लग्न करून दिलीं! पण एकानं तरी जाण ठेवायची होती!... चालायचंच, जगाची रहाटीच अशी आहे...त्यांत तुमचंही चुकत नाहीं म्हणा! तुझ्या सासूबाईंना तरी कशी दोष देऊं मी? अन् तुझं डोहाळजेवण, हवं-नको पहाणं, बाळंतपण...हें तरी सारं उजळ माथ्यानं कशी करूं मी?...अहांत तिथं सुखांत असा तुम्हीं तरी... एवढंच मागणं आतां... एवढंच!

*(बाहेर चारपांच तरुणांचा न् ताराचा निरोप घेण्याचा आवाज... "टाऽटा, बाय् बाय्, Thank yau for your sweet company, गुड्नाइट्!" ताराचा आवाज उंच, excited यावा.)*

**आई** : आली वाटतं...ट्रिपला गेली होती.

*(तारा येते. नुकतीच ट्रिपहून येते आहे---तिच्या वेषभूषेंत, केशरचनेंत, वागण्यांत, बोलण्यांत---नटवेपणा आलेला आहे. ती येते तेव्हां excited असते...पण घरांत आईसमोर यायचं म्हणून normal चेहरा करते. पुन्हा नलू दिसताच खरा आनंद.)*

**तारा** : हॅल्लो नलू--My sweet ! तूं कशी काय इकडे ? आज इतक्या दिवसांनीं ताराताईची आठवण झाली होय ? का माधवरावांनीं सोडलं नाहीं ?...काय म्हणताहेत माधवराव...अन् तुमचं गुपित ?

*(नलू आतां तिच्याकडे चेहरा पूर्णपणें वळवते. तिच्या डोळ्यांत पाणी आहे. ताराकडे पाहिल्यावर तिला रडूंच कोसळतें.)*

**तारा** : अरे, तूं रडते आहेस ? माझं सशाचं पिलूं रडतं आहे ? अरे अरे अरे ! काय झालं माझ्या कोंकराला ? माझ्या सशाच्या पिल्लाला ?...... असं रडायचं कशाला ?

*(नलूचे डोळे पुसायला पुढ होते. नलू तिचा हात झटकते.)*

**नलू** : *(सात्त्विक संतापानें)* तुला नाहीं रडूं येत ?

**तारा** : *(आश्चर्यानें)* तें काय म्हणून ग ?

**नलू** : *(उपरोधानें)* तुझं कोटकल्याण झालं म्हणून !... *(व्याकुळ)* काय करून घेतलंस स्वतःचं हें, ताई ? काय करून घेतलंस ?

**तारा** : काय झालं ?... लिप्स्टिक चांगली नाहीं दिसत मला ? गाल फार लाल झालेत, कीं पोट उघडं टाकलेलं शोभत नाहीं मला ? काय झालं ? ... काय बिघडलं ?...रडण्यासारखं काय झालंय् यांत ? अं ?

**नलू** : काय व्हायचं आतां बाकी राहिलंय ? ... अशी कशी फसलीस ग ?

**तारा** : मी ? कुठल्या बाबतींत ?

**नलू** : सगळं कळलंय् ताई मला !...अगदीं सगळं !...काय झालं तुझं हें ? कसं नेमकं नको तें करून बसलीस ?...अशी कशी फसलीस ताई, अशी कशी फसलीस ?

**तारा** : *(संथपणें)* फसायला तुझी ताई म्हणजे काय चौदा वर्षांची पोर वाटली तुला, नले ? मी फसलें नाहीं पोरी, जग फसलंय्, तुम्ही फसलांत ... अंवतीभंव-

तीचे टवाळखोर लोक फसले आहेत!...तुम्हांला वाटलं होतं कीं त्यानं दुसरं लग्न केलं कीं मी त्याची विधवा होऊन रडत बसेन, कढत कुढत बसेन, कोपऱ्यांत तोंड खुपसून त्याच्या नांवाचा जप करीत राहीन ... पण मी तर ... फसलांत कीं नाहीं तुम्हीं? कसं फसवलं? *(भयंकर हसते.)*

**नलू** : *(दचकून)* ताई...हसूं नकोस अशी—मला भीति वाटते ताई!... त्याच्यापेक्षां रड तरी चांगली!

**तारा** : पुन्हां तेंच...रडायचं कुणाबद्दल?

**नलू** : जें झालंय त्याच्याबद्दल!

**तारा** : सारं उघड्या डोळ्यांनीं केलेलं आहे मीं! त्याच्याबद्दल रडत बसून काय मिळायचंय?...आपण आपलं खावं, प्यावं, कपडलत्ते ल्यावे—मजा करावी! वेळ आहे तोंवर सगळं करून घ्यावं! त्यांत कसलं आलंय बरं नि वाईट? अखेर बरं नि वाईट तरी आपल्या मानण्यावरच आहे कीं नाहीं?...नले, सुखी व्हायचं असेल तर एक सांगतें तुला—भलतं-सलतं कांहीं मानून सुखापासनं दूर पळूं नये माणसानं!...कांहीं मानूंच नये. आपण प्रयत्न केल्यानं बाकीचीं माणसं सुखी होतील, तीं सुखी झालीं कीं आपल्या आनंदाला काय तोटा?—हें असलं बरंच कांहीं आपण मानतों ना ...तें अगदीं चूक आहे, साफ गलत आहे... साफ!...माझंच बघ ना आतां कसं झालं होतं तें!...जाऊं दे. तुला कळायच्या नाहींत गोष्टी या! कळूंही नयेत...विसरून जा मी बोललेलं...*(हंसते. तिच्या-जवळ जाते.)* काय मग, तुझं डोहाळजेवण कधीं करायचं ठरलं?...हिरवा खण, हिरवी साडी, हिरव्या बांगड्या...सगळं आणायचं हं आमच्या छबीला!...सासू-बाईंना विचारलंस? *(नलू खालच्या मानेनें नाहीं म्हणते.)* नाहीं?...कां नाहीं? लाज वाटली कीं काय? अं?

**नलू** : *(खालमानेनें)* ताई, मला सासूबाईंनीं इकडे यायला...इकडे पाऊल टाकायचं नाहीं म्हणून ताकीद दिलीय्··कधींच यायचं नाहीं मी इकडे. कधींच... *(हुंदका येतो.)*

**तारा** : *(घाबरून)* कां तें?

**नलू** : तूं ही अशी वागतेस म्हणून...

**तारा :** *(चिडून)* अशी म्हणजे? खूनबीन तर नाहीं ना केला कुणाचा मी?

**नलू :** त्यांच्या कानावर गेलंय् तुझ्या बाबतींत सगळं...

**तारा :** *(एकदम उमजून)* ओऽहो! बरं झालं, माझ्या रोगी संसर्गापासून वांचवतील त्या तुला! ठीक आहे. मर्जी त्यांची...न् तुझी!

**नलू :** *(जायला उठते.)* जातें आतां मी...यांची घरीं यायची वेळ झालीय्. चोरून आलें होतें मी...आतां परत गेलं पाहिजे मला...सासूबाईंना, 'ह्यां'नासुद्धां सांगितलं नव्हतं मी इकडे येणार आहें म्हणून...चोरून आलेंय...त्यांच्या लक्ष्यांत आलं तर रागावतील--जायलाच हवं मला ... *(मनाविरुद्ध)* जाऊं?

**तारा :** *(घायाळ झालेली आहे)* आल्यासारखी चहा तरी घेऊन जा.

**नलू :** नको ग आतां...

**तारा :** आईच्या हातचा आहे--मग तर चालेल ना? *(स्वयंपाकघरांत डोकावून)* आई, चहा केला आहेस ना आपल्या पाहुणीला? ... अन् शेगडी विझवूं नकोस—पाणी ठेव तिच्यावर. थोड्या वेळानं आणखी चहा करावाच लागेल...

*(आई चहा घेऊन येते. नलू चहा घेते. ताराच्या हातांत कप तसाच.)*

**नलू :** *(घाईनें चहा पिऊन)* येतें मी आई! येतें...गेलंच पाहिजे आतां मला.

**आई :** कुंकू लावून घे. देवाला नमस्कार कर...आतां पुन्हां केव्हां येशील, कोण जाणे! मी येतें थोडं पोचवायला तुला! देवालाही जाऊन येईन तशीच.

*(नलू देवाला कुंकू वाहून स्वतःला लावून घेते. तारालाही लावते. देवाला, आईला नमस्कार करते व तारापुढेंही नमस्कारासाठीं वांकते.)*

**नलू :** ताई, नमस्कार करतें. जपून रहा ग...जपून रहा!

**तारा :** *(तिला उठवीत व भयाण हंसत)* अग कांहीं घाबरूं नकोस. कांहीं वाईट होत नाहीं माझं!...तूंच जप स्वतःला. जपून जा....माधवरावांना म्हणावं की आमच्या कोंकराची नीट काळजी घ्या. फार काम सांगूं नका. *(नलू जायला निघते, तिला थबकवून)* आणि बरं कां ग नलू...पुन्हां कधीं भेटशील तें सांगवत नाहीं म्हणून आतांच सांगतें...वेड्यासारखी! तुला

मुलगी झाली तर तिचं नांव मीनल ठेवायचं...मावशीच्या आवडीचं म्हणून... ठेवशील ना—*(नांव घोळीत)* मीनल...मीनलची आई !

*(नल जाते. आईही तिच्याबरोबर. तारा अतिशय थकलेली, नलूच्या या असल्या भेटीमुळें घायाळ झालेली. थोडा वेळ नुसतीच स्तब्धता. मग दारावर टकटक होते.)*

**तारा** : कोण ?

*(उत्तर येतं, "मी कुमार. Can I come in ?" "ये, ये." तारा म्हणते. कुमार हळूच दार उघडून आंत येतो. हा चावीस तेवीस वर्षांचा कोवळा भाबडा तरुण आहे. ताराशीं तो अदबीनें, आपुलकीनें आणि प्रेमानें वागतो. हातांत कांहीं वस्तु. ताराची बॅग.)*

**कुमार** : *(soft)* काय करीत होतीस ?

**तारा** : कांहीं नाहीं रे, पडलें होतें थोडी !

**कुमार** : *(काळजीनें)* बरं वाटत नाहीं ?

**तारा** : छे रे, थोडंसं उगीच थकल्यासारखं वाटलं !

**कुमार** : ट्रिपचा त्रास झाला ना ?

**तारा** : त्रास ?

**कुमार** : त्रासच तर काय ? असल्या लोकांबरोबर चोवीस तास रहायचं म्हणजे... *(एकदम चिडून)* Cheap आहेत सगळे. क्षुद्र, भुक्кड—किड्यांसारखे !

**तारा** : एवढं चिडायला काय झालं ?

**कुमार** : कांहीं वेगळं व्हायला कशाला पाहिजे ? त्यांच्या संगतींत दहा मिनिटं राहिलों तरी डोकं उठतं माझं.

**तारा** : मग आला होतास कशाला ट्रिपला ?

**कुमार** : तुझ्यासाठीं. तुला भेटायला मिळावं—तुझ्याशीं मनसोक्त गप्पा मारायला मिळाव्यात, म्हणून आलों होतों.

**तारा** : मग ?

**कुमार** : *( चिडून )* त्या लोकांनीं तुझ्याभोवतीं गराडा घातला होता ना ! पांच

मिनिटं तरी मोकळी सोडली होती का त्यांनीं तुला ? आणि वर चिडलेच आहेत सगळे !

**तारा :** कुणावर ?

**कुमार :** तुझ्यावर !

**तारा :** तें कां रे बाबा ?

**कुमार :** लौकर परत यायला लावलंस ना तं ! आणखी एक दिवस काढायचा होता त्यांना !

**तारा :** अशी वाटेल तितके दिवस चंडोलासारखी हिंडायला मोकळी आहे का म्हणावं मी ? घरीं आई आहे मला. शिवाय ऑफिस आहे !

**कुमार :** त्या लोकांबरोबर.जितकं कमी वेळ राहतां येईल तितकं चांगलंच !

**तारा :** बरं, तूं कां आला आहेस परत ? आत्तांच तर मला पोंचवून गेलांत तुम्ही !

**कुमार :** हो, पण सहज आलों परत...*(वस्तूंचं स्मरण होऊन)* खरंच, हें सामान द्यायला आलों होतों तुझं. खोलीवर गेल्याबरोबर परत आलों हें घेऊन··· तुझी खोटी व्हायला नको म्हणून !

**तारा :** Oh ! How sweet of you ! कुणाच्या तरी बगेंत कोंबलं होतं निघतांना.

*(खरें म्हणजे कुमारचें काम झालेलें आहे. त्यानें आतां जायला हरकत नाहीं. त्यालाही हें कळतें आहे; पण तो तसाच घुटमळतो आहे. बोलायलाही कांहीं सुचत नाहीं आहे त्याला. गोंधळलेला. शेवटीं कांहीं तरी बोलायचें म्हणून विचारतो.)*

**कुमार :** बाहेर येतेस ? थोडं फिरायला जाऊं या ?

**तारा :** आत्तां ? या वेळेला ?

**कुमार :** हो...मला तुझ्याशीं कांहीं बोलायचंय्...कांहीं सांगायचं आहे... चल ना !

**तारा :** आत्तां पाहुणे यायचेत रे आमच्याकडे...

**कुमार :** पाहुणे आले तर आई आहेत ना घरीं !

**तारा** : पाहुणे माझ्याकडे यायचेत, मला भेटायला...माझे एक जुने मित्रच आहेत ते. मला थांबायलाच हवं आत्तां घरीं.

**कुमार** : मग, उद्यां संध्याकाळीं भेटशील, ऑफिस सुटल्यावर ?

**तारा** : उद्यां मी डिसूझाबरोबर जायचं कबूल केलंय. नाहीं तर आलें असतें... (तो नाराज झालेला पाहुन) हें बघ, असं करूं या. परवां संध्याकाळीं जाऊं या आपण. खूप लांब...हवं तितका वेळ. चालेल ना ?

**कुमार** : *(खट्टू होऊन)* चालेल म्हणायचं...

**तारा** : रागावला नाहींस ना ?

**कुमार** : *(या प्रश्नानें खुष होऊन)* छे ग...परवांपर्यंत पाहीन वाट मी... पण परवां अगदीं नक्की हं !

**तारा** : अगदीं !

**कुमार** : *(एकदम खुलून)* Thanks...so many thanks !...जाऊं मी आतां ?

**तारा** : अच्छा...

*(कुमार जातो. माधव दबकत येतो. गोंधळलेला. भ्यालेला. आंत येऊन अंग चोरून उभा रहातो. ताराचें लक्ष जात नाहींसें पाहून "ताराबाई" अशी हलकी हांक मारतो.)*

**तारा** : *(घाबरून...हा 'त्या' हेतूनें आला आहेसें वाटून)* तुम्हां ? माधवराव...तुम्हीसुद्धां इथं आलांत ? तुम्हीसुद्धां ?

**माधव** : *(तिची शंका याला शिवलेलीही नाहीं.)* बरेच दिवस यायचं म्हणत होतों !

**तारा** : कशाला ?

**माधव** : सहज आपलं...भेटायला म्हणून !

**तारा** : *(उपरोधानें)* तुमच्या आईना विचारून आलांय ना ?

**माधव** : *(सरळपणानें)*नाहीं. तिला सांगितलेलं नाहीं मी...तिला आवडणार नाहीं मी इकडे आलेलं...

**तारा :** कां ?

**माधव :** *(अडखळत)* कारण असं कांहीं नाहीं हो...असतात जुन्या माणसांच्या एकेक कल्पना...आपण कशाला दुखवा त्यांना ?

**तारा :** अस्सं ! आईनं अडवलं म्हणून तुम्ही इतके दिवस आलां नाहींत ! नलूची थोरली बहीण मी...मुलीसारखी वाढविली मीं तिला...तिला तोडलीत तुम्हीं माझ्यापासनं ! मला भेटायलासुद्धां बंदी केलीत तिला ! काय मिळालं तुम्हांला असं क्रूरपणानं वागून ?

**माधव :** मी तिला सांगणारच होतों तुम्हांला भेटून ये म्हणून. आईच्या नकळत आलं म्हणजे झालं...परक्या माणसाच्या सांगण्यानं रक्ताचं नातं तोडतां येईल का ?

**तारा :** आली होती आज ती...

**माधव :** आली होती ना ?

**तारा :** पण नसती आली तरच बरं झालं असतं, असं वाटायला लागलं तिच्या यातना पाहून !

**माधव :** हळवी आहे ती...फार मनाला लावून घेते...अन् सध्यांच्या तिच्या स्थितींत तर...

**तारा :** *(निर्वाणीचें बोलत)* मला काळजी करायचं कांहींच कारण नाहीं म्हणा ! माझीं सगळींच नातीं तुटलीं आहेत आतां !

**माधव :** असं कां म्हणतां तुम्ही ? इतक्या दिवसांत नलू किंवा मी आलों नाहीं याच्यावर जाऊं नका· तुम्ही...म्हणजे मीच तिला घेऊन इकडे यायला हवं होतं...

**तारा :** कशाला ? माझ्या समाचाराला ? माझी कींव करायला ?

**माधव :** कींव काय करणार ताराबाई आम्ही ? दुबळीं माणसं आम्ही...जरा लोकावेगळं कांहीं करायचं नुसतं मनांत आणलं तरी थरकांप उडतो आमचा ! नाहीं तर त्या दिवशीं बाळ तुमचे शतशः अपमान करीत होता तें मुकाट्यानं ऐकत बसलों नसतों मी...

**तारा :** *(तटस्थतेनें)* अपमान कसला त्यांत? खरं तेंच बोलत होता तो! मीच उगाच नाटक रचत होतें...प्रेमाचं, आनंदाचं, वैभवाचं!

**माधव :** कांहीं असलं तरी त्यानं धाकटी बहीण, मेहुणा यांच्यापुढं तसं वागायला नको होतं!

**तारा :** केव्हां तरी कळायचंच होतं सगळ्यांना!

**माधव :** पण माणूस भरकटायची, त्याची वाताहात व्हायची वेळ आली असतांना सहानुभूतीनं वागायला हवं इतरांनीं!

**तारा :** पुन्हां सहानुभूति? मला कुणाच्या सहानुभूतीची, दयेची जरूर नाहीं माधवराव! तशी तुमची कल्पना असली तर चूक आहे ती.

**माधव :** गैरसमज करून घेतां आहांत तुम्ही ताराबाई. तुमच्या तुम्ही समर्थ आहांत, आपल्या पायावर उभ्या अहांत. दुसऱ्या कुणीं तुम्हांला आश्रय द्यायचा? दया दाखवायची? मी आलों होतों एवढंच सांगायला कीं, कांहीं लागलं तर हक्कानं मला कळवा. मेहुण्याचं नातं मनांत आणूं नका. धाकट्या भावासारखा आहें मी तुम्हांला...तुम्ही सांगाल तें करीन मी. तेवढंच तुमच्या ऋणांतून मुक्त होतां येईल मला! खूप सोसलंय, ताराबाई तुम्ही. खूप सोसत अहांत—यांतलं थोडं कांहीं कमी करतां आलं तर फार समाधान वाटेल मला...*(थोडा वेळ स्तब्धता)* येऊं मी आतां?...गैरसमज करून घेऊं नका. भावासारखा आहें मी तुम्हांला, एवढं लक्ष्यांत ठेवा! जपून रहा...येतों मी...

*(जातो.*

*या अकारण स्नेहामुळें तारा भारावून जाते. सुन्न होते. थोडा वेळ नुशीच, कांहीं सुचत नसल्यासारखी उभी रहाते. तो मानसिक भार असह्य होऊन, फोनोजवळ जाते, किल्ली देऊन रेकॉर्ड लावते. इंग्रजी गाण्याच्या स्वैर सुरांमुळें तो भार नाहींसा होऊन ती मोकळ्या मनानें वावरूं लागते. घड्याळाकडे पहाते. लिपस्टिक पॉवडर करूं लागते. गाणें ऐन रंगांत आलें असतांना एक शेजारी धाडकन् दार उघडून आंत येतो. मध्यमवयीन, प्रतिष्ठित.)*

**शेजारी :** अहो बंद करा, बंद करा तें गाणं...डोकं उठतंय त्यानं!

**तारा :** बसा ना! डोकं उठतं या गाण्यानं? मला फार आवडतं तें! तुम्हांला?

**शेजारी :** नाहीं आवडत. मुळींच नाहीं !

**तारा :** कमाल आहे !

**शेजारी :** *(वैतागून)* कमाल आहे काय ? घरांत काय वाटेल तो धुडगूस घालतां तो पुरे नाहीं का झाला ? तो एक आम्ही बंद करूं शकत नाहीं. मरानात कां तिकडे ! पण वेळींअवेळीं हीं थिल्लर अचकटविचकट गाणीं लावतां, चार-चार जणं मिळून गातां त्याच्याबरोबर. सभ्य माणसानं रहायचं कसं तुमच्या शेजारीं ? तुम्हांला न् तुमच्या मातुश्रींनाच शोभतं सारं ! आतां शेवटचं सांगतों, पुन्हां जर तो फोनो लावाल तर फोडून टाकीन. ऐकणार नाहीं. आलं का लक्ष्यांत ?

*(जसा आला तसाच पाय आपटत निघून जातो. तो गेल्याबरोबर तारा हंसते नि पुन्हा तीच रेकॉर्ड सुरू करते. केस वगैरे सारखे करते आहे तों दार वाजतेंच.)*

**तारा :** कम् इन् ! शेखरबाबू कम् इन् !

*(एक सुखवस्तु तरुण चंद्रशेखर येतो. तारा फोनो बंद करते )*

**तारा :** अगदीं ऑन टाइम् हं ! दिलेली अपॉइंटमेंट दिलेल्या वेळीं पाळायची संवय कायम दिसतेय तुझी अजून ! बैस, बैस. केव्हां आलास ?

**शेखर :** आज सकाळींच.

**तारा :** सकाळीं आलास नि आत्तां भेटतोस मला ?

**शेखर :** दुपारीं ऑफीसवर फोन केला होता मी तुझ्या ! तूं रजेवर असल्याचं कळलं. कुठं ट्रिपला गेली होतीस म्हणे !

**तारा :** हो ना. ही आतांच परत आलें ! उगीचच बोललें तुला ! तुझी परीक्षा पहायला. म्हटलं, अमदाबादला गेली स्वारी तर चार महिन्यांत एक पत्र-सुद्धां पाठवलं नाहीं. तिथंच रमून गेली ! इथं आल्यावर तरी ताराची आठवण केव्हां झाली तें पहावं !

**शेखर :** अहमदाबादला रमून तुझी आठवणच विसरलों असतों तर पत्र पाठवून कळवलं नसतं मी येणार आहें म्हणून.

**तारा :** Thank you, thank you ! आणि मीसुद्धां ट्रिपला गेलें होतें तरी

तुझीच आठवण काढीत होतें. उद्यां निघायचा बेत होता सगळ्यांचा, तर हट्टानं आज यायला लावलं मीं. चिडलेत सगळे माझ्यावर !

**शेखर :** सगळे म्हणजे कोणकोण ?

**तारा :** हेच आपले—शेख, शहा, पाटील, कुमार !

**शेखर :** *(खोदून)* आणखी कोण होतं ?

**तारा :** आणखी कोण असणार ? आमची आम्हींच ठरवली होती ट्रिप ! आमच्या ऑफिसांतल्या आजीबाया बसल्या आहेत यायला !

**शेखर :** *(संशयानें)* म्हणजे तूं एकटीच बाई—मुलगी होतीस असं म्हण ना ?

**तारा :** हो हो, एकटीच *(एकदम त्याचा रोख लक्ष्यांत येऊन)* ओहो, शेखर-बाबू, Jealous Jack हं ? माझ्या लक्ष्यांतच आलं नाहीं इतकी खोदून कां चौकशी करतो आहेस तें ! पागल !...काय वाटेल तें डोक्यांत घ्यायचं होय ?...तुम्ही असे रागावणार असं जर आम्हांला आधीं माहीत असतं तर...म्हणजे त्या सगळ्यांचा राग ओढवून घेऊन मी लौकर परत आलें त्याला कांहींच किंमत नाहीं ना ? एवढं रागवायला म्हणूनच आलास वाटतं अहमदाबादहून इथं ?

**शेखर :** नाहीं ग, पण लोक वाटेल तें बोलतात, म्हणून—

**तारा :** लोक गेले मसणांत ! आपण दोघं हिंडत होतों तेव्हांही लोक असंच कांहीं म्हणत होते.

**शेखर :** पण खरं होतं तें सारं !

**तारा :** खरं न् खोटं. लोकांचं बोलणं इतकं मनावर घ्यायचं नसतं शेखरबाबू ! तसं केलं तर जगतांच यायचं नाहीं कुणाला !...बरं, चहा घेणार का कॉफी ?

**शेखर :** कांहीं घ्यायलाच पाहिजे का ?

**तारा :** तर ! हें काय विचारणं ? आज इतक्या दिवसांनीं आपण भेटतोंय्, तुझ्या नाकावर बसलेला राग घालवण्यांत मी एकदां तरी यशस्वी झालेंय. तेव्हां साजरं नको का करायला ? एका मिनिटांत, तुझ्याशीं बोलत बोलतच चहा करतें, तोंवर तूं ओरडत अहमदाबादची हकीकत सांग !

*(तारा आंत जाते.)*

**शेखर :** अमदाबादची काय हकीकत असायचीय् ? काम, काम आणि काम !

गुरासारखा राबलों चार महिने.

*(चहाचं सामान घेऊन तारा बाहेर येते.)*

**तारा** : तुला स्ट्रॉंग लागतो नाहीं का चहा?

**शेखर** : अजून लक्षांत आहे वाटतं?

**तारा** : हो! आम्ही विसरत नाहीं असे तुमच्यासारखे! *(चहा देते.)* काय रे, अमदाबादला गेल्यावर तारा म्हणून आपली कुणी मैत्रीण होती, आठवड्यांतनं एक तरी पत्र टाकायचं आपण तिला कबूल केलं होतं, ती आपल्या पत्राची वाट पाहणार होती, सारं विसरलास वाटतं? एवढी कोण भेटली तरी कोण तुला?

**शेखर** : कोणी भेटलं नाहीं! सांगितलं ना तुला कीं गुरासारखा राबलों चार महिने म्हणून? शेवटीं कंटाळलों अन् काल रजा घेऊन निघून आलों. निघायचं ठरल्याबरोबर आधीं धांवत दुकानांत गेलों...

**तारा** : तें कशासाठीं बाबा?

**शेखर** : मला माहीत होतं चार महिने पत्र न पाठवण्याचा गुन्हा केल्याबद्दल ताराबाईसाहेब रागावणार. त्यांना खंडणी द्यावी लागणार म्हणून...*(एक नेकलेस दाखवतो.)*

**तारा** : लव्हली! तुझी निवड म्हणजे कमाल आहे हं शेखरबाबू!

*(शेखर नेकलेस घालायला म्हणून तिच्या अगदीं जवळ जातो. त्याची दाराकडे पाठ आहे. ताराची आई येते. ताराला ती दिसते.)*

**तारा** : *(शरमेनें ओरडून, शेखरपासून दूर होते.)* आई, तूं कशी इतक्यांत परत आलीस?

**आई** : अग, देवापुढं ठेवायला तांदूळ न्यायचे विसरलें...

*(तारा व शेखर ackwardly उभीं असतांनाच आंत जाऊन तांदळाचें भांडें घेऊन निघून जाते. थोडा वेळ स्तब्धता. तारा स्वतःला सावरून घेऊन बोलूं लागते.)*

**तारा** : मुक्काम किती आहे तुझा?

**शेखर** : चारपांच दिवस!

**तारा** : म्हणजे या वेळेला आपल्याला हिंडायफिरायला मिळणारच नाहीं!

**शेखर** : ते कां ? आईना आवडणार नाहीं म्हणून ?

**तारा** : *(एकदम गंभीर होते.)* तसं नाहीं रे...*(एकदम सबब सुचते.)* अरे, उद्यां नि परवां मी फार बिझी आहें बघ !

**शेखर** : आणि नंतर ?

**तारा** : नंतर तसं कांहीं काम नाहीं. पण ही अशी हिंडत राहतें मी, कामही सध्यां फार असतं ऑफीसांत. त्यामुळं कधीं विश्रांतीच मिळत नाहीं बघ. मध्यंतरीं मला जरा बरं वाटत नव्हतं तेव्हापासनं सारखा weakness वाटतोय् मला. या वेळेला जरा माफ कर हं...

**शेखर** : तुझी मर्जी !

**तारा** : तसं नाहीं रे...तुझ्याबरोबर यायला मलाही किती आवडलं असतं तें तुला माहीतच आहे. पण...

*(विश्वनाथ "हॅलोऽ" करून घरांत येतो. "या, बसा" म्हणून तारा त्याला खुर्चीवर बसवते. आपण मुद्दाम शेखरशेजारीं कोचावर बसते. थोडा वेळ स्तब्धता.)*

**तारा** : *(भानावर येऊन)* तुमची ओळख करून देतें ! बरं का शेखरबाबू, हे मिस्टर विश्वनाथ गोखले. माझे...माझे मेहुणे, म्हणजे बहिणीचे यजमान. आणि हे मिस्टर चंद्रशेखर पंड्या.

*(दोघे हस्तांदोलन करतात.* "Glad to meet you", "How do you do" *म्हणतात. स्तब्धता.)*

**शेखर** : मी निघतां तर...

**तारा** : निघालास ? *(चक्क खोटं बोलते. शेखर सुरवातीला थोडा गोंधळतो, पण तारा सारखीच बोलत राहिल्यावर त्याचा गोंधळ विरतो.)* मग तेरवांची अपॉइंटमेंट पक्की बरं का आपली ! मी Niros पाशीं वाट पाहीन तुझी. तुला पार्टी देणं आहें मी ! डिसूझांनीं मला एकदम बढती दिलीन्...खूप आहे सध्यां स्वारी माझ्यावर !

**शेखर** : मग त्या मिस् सुळे आणि रणदिवे, त्यांचं काय झालं ? मारे नटूनथटून त्याच्यापुढें नाचायच्या त्या !

**तारा** : उघड आहे त्यांचं काय झालं तें. त्यांची हार झाली, माझी जीत झाली!

**शेखर** : मग आपण तेरवां भेटणार तर!

**तारा** : हो ऽ, पार्टी म्हणत असलास तर पार्टी, नाहीं तर सिनेमा ... तूं म्हणशील तें ... तूं मागशील तें!

**शेखर** : अन् तुझी प्रकृति ?

**तारा** : तिचं बघतां येईल रे! तुझं मन मोडून माझ्या तब्बेतीचे लाड कधीं पुरवीन का मी?

**शेखर** : बरं...अच्छा!

*(तारा त्याला पोंचवायला जाते. "*Good night, sweet dreams!" "Yes, sweet dreams about you!" *तो म्हणतो. ती मोठ्यानं हंसते. विश्वनाथवर आपल्या* hilarity *ची छाप पाडायची आहे तिला, हें उघड कळावें अशी हंसते. परत येते.)*

**विश्वनाथ** : *(किंचित्काल ताराचें निरीक्षण करून)* हा कोण नवीन गांठला आहेस ?

**तारा** : नवीन? खूप जुना दोस्त आहे हा माझा! महाबळेश्वरला गेलों होतों आम्ही मागच्या वर्षी, तेव्हांची ओळख! एकाच लॉजमध्यें उतरलों होतों आम्ही.

**विश्वनाथ** : नुसती ओळख दिसत नाहीं...

**तारा** : नुसती ओळख! नुसती ओळख कधीं कुणाबरोबर टिकते का? ओळख, नंतर दोस्ती, नंतर प्रेम, नंतर आणखी सारं!

**विश्वनाथ** : वाटलंच होतं मला तें?

**तारा** : तसा आहेसच तूं चतुर!

**विश्वनाथ** : मीं ऐकलं होतं तें खोटं नाहीं तर मग!

**तारा** : काय ऐकलं होतंस तूं?

**विश्वनाथ** : सगळं...सगळ्या प्रकारचं! चांगल्या बाईबद्दल सहसा कुणी जें बोलत नाहीं न् बोलूं नये तें. ज्या कुणाशीं बोलतांना तुझा विषय निघाला...

**तारा :** माझा विषय तुझ्या तोंडून निघायची काय जरूर? काय संबंध तुझा नि माझा?

**विश्वनाथ :** एके काळीं, शक्य झालं असतं तर, तुझा नि माझा संबंध जगांतला सर्वांत जवळचा संबंध झाला असता, तारा.

**तारा :** *(उपरोधानें)* शक्य झालं असतं तर!...खरंच, किती घोर संकटं कोसळलीं तुझ्यावर त्या वेळीं! कांहींही करणं तुला अशक्यच होऊन बसलं मुळीं!...अठराएकोणीस वर्षांच्या गोऱ्यागोमट्या पोरीशीं लग्न करावं लागलं, सासऱ्याच्या कारखान्यांत नोकरी धरावी लागली, पंधरा हजार हुंडा घ्यावा लागला. च्च्च्—काय संकटं कोसळतात माणसावर!

**विश्वनाथ :** *(नाटकीपणानेंच)* खरं आहे, तूं अशीच टोचून बोलणार मला! आईवडिलांच्या, थोरल्या भावाच्या मनाविरुद्ध जायचं म्हणजे केवढं संकट असतं याची तुला कल्पना नाहीं येणार! मनाला येईल तसं वागायला तुझ्यासारखा मोकळा नव्हतों मी.

**तारा :** *(त्याच्या कांगावखोरपणाकडे दुर्लक्ष करीत)* सध्यां ती कुठं आहे?

**विश्वनाथ :** *(दचकून)* कोण?

**तारा :** बायको तुझी!

**विश्वनाथ :** माहेरीं गेलीय्....

**तारा :** तरीच...

**विश्वनाथ :** तरीच काय?

**तारा :** तरीच एवढा पत्ता काढीत आज माझ्याकडे आलास.

**विश्वनाथ :** कां?...एरवीं तुझ्याकडे यायचा हक्क नाहीं मला?

**तारा :** असं कसं होईल? विश्वनाथ, चार जाणत्या लोकांच्या तोंडनं तूं ऐकलं असशील—ताराकडे कुठलाही पुरुष जाऊं शकतो. एकादी सेंटची बाटली, एकादी बेहोष संध्याकाळ, एकादी भपकेदार साडी...आणि कोंवळ्याकोंवळ्या शब्दांचीं भेंडोळीं...याच्यावर कुणीही तिला विकत घेऊं शकतो. हवा तितका वेळ, हवी तेवढी! तिच्याकडे जायला हक्क न् अधिकार असल्या फालतू गोष्टींचा विचारच करावा लागत नाहीं. ती आतां 'चांगली बाई' उरलेलीच नाहीं. *(चिडून)*

म्हणून—म्हणून तूं आला आहेस. घटकाभर चैन करायला, मजा मारायला! बायकोच्या अभावाचं दुःख घालवायला! काय भाव करणार आहेस माझा?

**विश्वनाथ :** तारा, तुला न्यायला आलों आहें मी!

**तारा :** कुठें?

**विश्वनाथ :** तूं म्हणशील तिथं! उटी, उटकमंड, काश्मीर, माथेरान...तूं म्हणशील तिथं जायचं. तूं म्हणशील तें करायचं! कशाचीच उणीव पडूं देणार नाहीं मी तुला! तुला इथनं, या नरकांतनं आधीं बाहेर काढायला आलोंय्. आज चार टोळभैरव डोक्यावर घेताहेत तुला. पण चार दिवसांनीं सारे सोडून जातील, सगळ्यांची लहर फिरेल! कुणी कुत्रंदेखील राहाणार नाहीं तुझ्याबरोबर! म्हणून म्हणतों, माझ्याबरोबर चल. This is our last chance!

**तारा :** फार महाग भाव झाला हा विश्वनाथ! मला परवडत नाहीं रे, इतकी किंमत देणं! आपलीं या विषयावरचीं बोलणीं फिसकटलीं असंच समजूं या का आपण?

**विश्वनाथ :** या नरकांतनं बाहेर पडायची शेवटची संधि देतों आहें मी तुला, तारा!

**तारा :** आयुष्यांत एकदां तरी स्वतःच्या विचार न करतां दुसऱ्याचा विचार करायची संधि मीं तुला दिली...याबद्दल आभार मान माझे!

**विश्वनाथ :** फार बोलते आहेस तारा तूं!

**तारा :** फार धाकसा दाखवतो आहेस? वाटेल त्या माणसाला गिऱ्हाइकाच्या मानानं वागवायला अजून दुकान उघडलेलं नाहीं मी माझ्या देहाचं, माझ्या खुशीचं! मला नको असलेल्या माणसाला मी जा म्हणून सांगूं शकतें. तसं सांगूनही तो गेला नाहीं तर आरडाओरडा करून माणसं बोलावूं शकतें शेजारचीं ...तीं कानच लावून असतात आमच्या भिंतींना! तेव्हां आपण आतां जावं हेंच चांगलं! असं पुन्हां यायची तसदी आपण घेणार नाहीं याची खात्री आहे मला! अच्छा...

**विश्वनाथ :** तारा, माझ्या माहितींत एक बंगला रिकामाच आहे. पुन्हा एकदां विचार कर. तूं आणि मी...

**तारा** : *(निश्चयानें)* तें दार तिकडे आहे ... उघडंच आहे. *(हिंस्र सूर)* एका क्षणाच्या आंत माझ्यापुढून नाहींसा झाला नाहींस तर...

*(विश्वनाथ तिच्याकडे रोखून पाहात निघून जातो. ती त्याच्या मागें दार लावून घेते. थोडया वेळानें दारावर भितरी टकटक ऐकूं येते. ती* "Come in" *म्हणते. कुमार येतो.)*

**तारा** : *(त्याच स्वरांत)* पुन्हा तूं? आज झालंय् तरी काय तुम्हांला? मी दुकान मांडून बसलें आहें असं तुलाही वाटलं कीं काय? —कुमार, आतां तुला भेटायची इच्छा नाहीं माझी. तूं निघून जाशील तर फार उपकार होतील माझ्यावर.

**कुमार** : अशी काय रागावतेस? मला तुझ्याशीं कांहीं बोलायचंय् ...फार महत्त्वाचं.

**तारा** : परवांची ॲपॉइंटमेंट दिलीय् मी तुला!

**कुमार** : परवांपर्यंत थांबणं शक्य नाहीं ग मला! खरं म्हणजे मघाशींच मी तें सांगायला आलो होतों — पण कसं सांगावं तेंच कळलं नाहीं ... आतां हें लिहून आणलंय् मी...वाचतेस का? वाच ना ...

*(ताराच्या हातांत एक निळं पाकिट देतो. ती वाचत असताना मटकन् खालीं बसते.)*

**तारा** : *(पत्र वाचते)* "प्रिय तारा, आज माझा तेवीसावा वाढदिवस..." अरे, हें मला माहीतच नव्हतं. Sorry हं! Many happy returns! *(पुन्हा वाचन)* "आज, या दिवशीं, गेले चार महिने माझ्या मनांत सारखा घोळत असलेला प्रश्न, तुला विचारायचा असं ठरवलं आहें मी." कसला बाबा एवढा प्रश्न! *(पुन्हां वाचन)* "कदाचित् तो प्रश्न विचारण्यानं तुझ्या चांगुलपणाचा गैर-फायदा घेतों आहें असं तुला वाटेल—" नाहीं बाबा. कैक जणांनीं घेतलाय् तो. तूं कितवा तरी!... *(पुन्हां वाचन)* "पण कुमारचं मन आतां तुला अज्ञात नाहीं. आयुष्यांत कुणी प्रेमानं विचारपूस केली नव्हती माझी. एकलकोंडा वाढलों आणि एकलकोंडाच जगत आलों मी. माझ्या एकाकी आयुष्यांत प्रथम आपुलकीनं वागलीस ती तूंच. तुला कल्पनाही नसेल तारा, पण तुझ्या साध्या साध्या शब्दांनीं माझ्या कोरडया मनाला ओलावा मिळत होता. जास्त लिहीत

नाहीं. कृत्रिमपणा येतो त्यानं...पण सांगतों, तूं भेटली नसतीस तर या जगांत मी किती दिवस काढले असते कोण जाणें ! आणि आतां असं वाटत आहे कीं इतके दिवस तुला विचारीन म्हणत होतों तें विचारलं नाहीं, अन् तुला गमावून बसलों, तर सर्वस्वच निसटून जाईल माझ्या हातचं... *(ताराचा आवाज कांपत चालला आहे)* तारा, साधं सरळ विचारतों, आतांपर्यंत जसं मला आपलं म्हटलंस तसं पुढंही म्हणशील का? जन्मभर? कायमचं? ताराराणी, माझ्याशीं लग्न करशील का?" *(एकदम ओरडल्यासारखें करून)* कुमार, काय डोक्यांत घेतलं आहेस तूं हें? वेडबीड तर लागलं नाहीं ना तुला? का माझी थट्टाच करायची लहर आलीय् तुला?

**कुमार :** *(मऊ आवाजांत)* ही थट्टा वाटते तुला?

**तारा :** तर काय? चार महिने विचार करून शेवटीं लग्नाचं विचारायला तुला दुसरी कुणी मिळाली नाहीं?...अरे, नुसता वयाचा विचार केला तरी...या लिपस्टिक व रूजनं माझ्या वयांतलीं दोनचार वर्षं कमी होत असलीं, तरी कुणी इतकं फसेलसं वाटलं नव्हतं मला!

**कुमार :** वयाचा न संसाराचा काय संबंध?

**तारा :** भोळा आहेस! फार फार लहान आहेस तूं अजून कुमार! चार लोकांत कधीं मिसळला आहेस का? मग ते चार लोक, माझ्याबद्दल काय बोलतात तें ऐकलं आहेस का?...ऐकलं आहेस ना? अजून तुला शंका येत असली तर सांगतें ऐक...चार लोक बोलताहेत त्यांतलं अक्षरन् अक्षर खरं आहे. त्यांना कल्पना असेल त्यापेक्षांही अधिक खरं आहे...

**कुमार :** चार लोकांशीं मला कांहींही कर्तव्य नाहीं. तारा, मला हवी आहेस ती फक्त तूं! चार लोकांना जें दिसलं नाहीं तें तुझ्यातलं चांगुलपण, तें मोठेपण मला दिसलं आहे. तारा, तें मला हवं आहे. धाकट्या बहिणीच्या लग्नासाठीं आफीसांतून हजार रुपये कर्ज काढलंस तूं...शेखला इन्फ्लुएंझा झाला होता आणि रजा संपल्यामुळं त्याला ड्यूटीवर यावं लागायचं तेव्हां त्याच्या टेबला-वरचं निम्मं अधिक काम तूं करायचीस...आणि ऑडिटांत पन्नास रुपयांची अफरातफर केल्याचा आरोप माझ्यावर येणार होता तो तूं पैसे भरून परस्पर टाळलास हेंही मी कधींच विसरूं शकणार नाहीं तारा! हें अकारण चांगुलपण

मी कुठेंच पाहिलं नव्हतं. तें तुझ्यांत आहे. तें मला हवं आहे. I want you to be my guardian angel, my...my mother...my partner for life !

**तारा** : भोळ्या पोरा, माझ्या एवढ्याश्या पुण्याईच्या मोबदल्यांत काय द्यायला निघालास हें ?...माझं ऐक कुमार...ही भक्ति, हें प्रेम, हा खुळेपणा दुसऱ्या एखाद्या चांगल्या मुलीपुढें...

**कुमार** : मी सल्ला विचारला नाहीं तुला...तारा, आणखी एक जिव्हारीं जखम करायची लहर आलीय् का तुला ?

**तारा** : कुमार, तुला कळत नाहीं रे! घरटं बांधायचं म्हणजे नुसते दोन जीव एकत्र येऊन भागत नाहीं. त्याला आणखीही पुष्कळ कांहीं लागतं...थांब, नुसता पैसा नाहीं...आणखीही कांहीं...न सांगतां येण्यासारखं, शब्दांत न पकडतां येणारं! अन् त्यांतलं कांहीं एक माझ्याजवळ उरलेलं नाहीं आतां...कुठून तरी वाऱ्याचा एक भोंवरा आला कुमार, अन् त्यानं माझ्याजवळचं सगळं कांहीं हिरावून घेतलं, लुटून घेतलं...आणि भिरकावून दिलं! एक काटकीही माझ्या-जवळ उरलेली नाहीं ..तुझं घरटं मी कशी बांधणार ? तुझ्या घरकुलांत मला, माझ्यासारखीला जागा नाहीं कुमार...माझ्या हाताचा नुसता स्पर्श झाला तरी... तरी सोन्याची माती होऊन जाईल! नसता हट्ट धरूं नकोस...नसत्या खाईत उडी टाकूं नकोस...

**कुमार** : मला सगळ्याची कल्पना आहे तारा, सगळं माहित आहे. तुझा वाईटपणा म्हणजे काय तें मला कळलं आहे नी तुझ्यांतलं चांगलं तर प्रत्यक्ष माझ्या वांट्याला आलं आहे. मला दुसरं कांहीं सांगूं नकोस ... नुसतं हो म्हण, नुसतं हो! ... तुला फुलासारखी ठेवीन मी, फुलासारखी जपेन तारा ! हो म्हण, नुसतं हो म्हण तारा !

**तारा** : जें एकदां माझ्याकडे पाठ फिरवून गेलं त्याच्या तोंडून अशी हांक घालूं नकोस मला, कुमार. दया कर रे माझ्यावर...नसता मोह घालूं नको मला ... जा रे. नाहीं तर भलतंच कांहीं होऊन बसेल माझ्या हातनं...भलतंच, आणि सत्यानाश होईल तुझा! एवढं ऐक माझं कुमार...जा इथून आतां तूं...Please ! जा ना!

**कुमार** : तूं हो म्हटल्याखेरीज जाणार नाहीं मी तारा !

**तारा** : कुमार!

**कुमार :** तुझ्या एका शब्दानं माझ्या आयुष्याचं सोनं व्हायचं कीं माती व्हायचीय् तें ठरायचंय्! तारा, मी गरीब आहें. माझ्याजवळ तुला द्यायला कांहींही नाहीं...भिकारी आहें मी. पण तारा, एक दौलत आहे माझ्याजवळ... माझ्या मनांतून तुझ्याबद्दल भरून राहिलेलं, तुला पाहतांक्षणीं भरतीला येणारं, तुझ्या एका शब्दासाठीं ताटकळून बसणारं माझं प्रेम! तें अर्पण करायला आलोंय मी! तारा...

**तारा :** *(मुद्दाम* mood *बदलून)* झालं बोलून!

**कुमार :** कसं बोलायचं ... कसं तुला माझ्या मनांतलं कळवायचं?

**तारा :** कळलं सारं मला. मूर्ख आहेस! प्रेम करतो आहे माझ्यावर! प्रेम! कोंवळ्या पोरा, नुसती खेळलें मी तुझ्याशीं, तर प्रेम करायचं सुचलं होय तुला लगेच? एवढंही उमगलं नाहीं कीं माझं तुझ्यावर कधीं प्रेम नव्हतं, आजही नाहीं, अन् कधीं बसणारही नाहीं.

**कुमार :** खोटं आहे तारा हें!

**तारा :** माझ्याशीं बळजबरीनं लग्न लावायला आला आहेस तूं?...कीं आपल्या भोळ्या कल्पनांनीं माझा उद्धार करायला आला आहेस? *(उपहासानें)* एका पतित अबलेचा उद्धार...

**कुमार :** गैरसमज करून घेते आहेस तारा.

**तारा :** पण माझा उद्धार करून घ्यायचा नाहीं आहे मला—तुझ्याशीं संसार करणं तर मुळींच शक्य नाहीं मला! डोळे उघडे ठेवून दारिद्र्याच्या खाईत कशाला उडी टाकूं मी? ...भिकारड्या पोरा, तुझ्या महिन्याच्या पगाराच्या दुप्पट पैसे नुसते साड्यांना लागतात माझ्या...केवळ साड्यांना! आहे तुझ्यांत एवढा खर्च करायची धमक? जमेल तुला तें? मोठ्या प्रेमाच्या गोष्टी बोलतोय्! हः! दुसऱ्या एखाद्या भोळ्या पोरीपुढं आपल्या या दुबळ्या प्रेमाचं रडवं प्रदर्शन कर! ती फसेल कदाचित्! पण माझ्या घराची पुन्हां पायरी चढूं नकोस! जा—जा म्हणून सांगतें ना? असा काय बघतो आहेस माझ्याकडे? वेड नाहीं लागलेलं मला! एक क्षण उभा राहूं नको माझ्यापुढं.... जा, चालता हो...चालता हो...

*( त्याला दाराबाहेर काढते. तो जड पावलांनीं सावकाश निघून जातो. त्याची पाठ वळल्यावर तारा त्याच्या पावलाचे आवाज ते ऐकूं येईनासे होईपर्यंत ऐकत रहाते...जिवाचे कान करून. आवाज थांबल्यावर कोचावर पडून, तोंड लपवून, आतांपर्यंत कधीं केला नाहीं असा आक्रोश करूं लागते. तिचं लक्ष नसतांनाच बाळ येतो. एक वळकटी, बॅग घेऊन तो परत आलेला आहे. भेसूर दिसतो आहे. सामान खालीं ठेवतो दाराशीं. ताराच्या पाठमोऱ्या आकृतीकडे नजर टाकतो. ताराला फक्त त्याच्या पावलांची चाहूल लागते. )*

**तारा :** *( मान खुपसुनच )* आई !...आलीस तूं आई ! कां अशी अंवतीं भोंवतीं रहातेस माझ्या ?...पिशाच्चासारखी ? जा तूं...माझ्या इथं राहूं नकोस. आतां तुझ्या मुलाला नोकरी लागली आहे...बाळला—तिकडे जा. तुझं तोंड पहाणं अशक्य झालंय् आतां मला आई ! इतके दिवस माझ्याबरोबर राहिलीस, सगळं केलंस माझं, संभाळून घेतलंस मला...फार उपकार झाले आई ! दुसऱ्या कुणीच केलं नसतं हें ! पण आतां मला एकटीला राहूं दे, एकटीला भोगूं दे सारं ! तूं बाळकडे जा, तूं बाळकडे जा, आई !

*(बाळ आंत येऊन हें ऐकत उभा आहे. कांहींच उत्तर मिळत नाहीं म्हटल्यावर तारा वर बघते, बाळ तिच्यासमोर उभा आहे. चमकून, भयाणपणें)*

कोण, बाळ ? तूं कसा इथं ?

**बाळ :** *(मख्खपणानं)* होय, मीच. नोकरी सुटलीय माझी. इथंच रहाणार आहें मी यापुढं ... इथंच !

*(तारा बधिर होऊन पहाते आहे. डोळे फाडून. तिच्या अंगाला कंप सुटला आहे. बाळ तसाच बसलेला असतांना—)*

**पडदा.**